# संसार

शं. वा. शास्त्री

सुरस ग्रंथमाला - सोलापूर

श्री. रावसाहेब निंबरगीकर, सोलापूर



अनेक सामाजिक, राजकीय व शैक्षणिक संस्थांचे संस्थापक,
संवर्धक व संरक्षक, तसेंच अनेक स्वकीय स्नेहीमंडळींच्या
संसारांचे निःस्वार्थी आधारस्तंभ
**यांस सादर समर्पण !**

—प्रकाशक

# प्रस्तावना



प्रबोधकुमार संन्यालच्या मूळ बंगाली कादंबरीची ही मराठी प्रतिकृति वाचकांपुढें ठेवीत आहें. प्रस्तुत पुस्तकाला ' कादंबरी ' म्हणायला कांहीं वाचक कदाचित् तयार होणार नाहींत. कारण कादंबरीच्या कथानकासंबंधींचें सर्वमान्य तंत्र येथें पाळलेलें त्यांना आढळणार नाहीं. पण थोडें खोलांत शिरून विचार करण्याचा प्रयत्न केल्यास येथेंहि कथावस्तूच्या मूळ गाभ्याच्या बाबतींतले धागेदोरे आढळणार नाहींतच असें म्हणतां येणार नाहीं. जीवनाचें यथार्थ दर्शन आणि मनुष्यस्वभावाचें चित्रण हें ज्यांना कथा-वाङ्मयाचें प्रमुख अंग आहे असें वाटतें, त्यांच्यासाठीं येथें भरपूर सामुग्री आहे. विशेषतः शेवटीं शेवटीं चारुबालेचें जें प्रकरण आलें आहे तें ह्या दृष्टीनें विशेष उल्लेखनीय आहे. मराठींत नित्यशः प्रसिद्ध होणाऱ्या कादंबऱ्यांपेक्षां तंत्राच्या दृष्टीनें ह्या कादंबरींत जो एक निराळेपणा आहे, तोहि वाचकांना आकर्षक वाटल्यावांचून राहणार नाहीं असें वाटतें.

मुळांतील भाव अधिक स्पष्ट करण्यासाठीं क्वचित् प्रसंगीं किंचित् स्वातंत्र्य मीं घेतलें आहे. तेवढे प्रसंग वगळल्यास अनुवाद मुळाला संपूर्णपणें धरूनच आहे.

—शं. बा. शास्त्री

# १

एक एक करीत, हळू हळू होतां होतां, जेव्हां सर्वच कोलाहल समाप्त होऊन जातात असा काळ माणसाच्या जीवनांत आल्यावांचून राहत नाहीं. त्याला म्हणतात वार्धक्य. वार्धक्याच्या ह्या काळांत मग वेळीं-अवेळीं बांसरीचे स्वर उमटत नाहींत. नवे नवे तरंग पुनः पुनः उसळत नाहींत, कांहीं स्फुरत नाहीं ! झाडापासून विलग झालेल्या शुष्क पाना-पाचोळयाचा फक्त एक ढीग त्या काळांत धुळींत लोळत पडलेला असतो, वाऱ्याच्या पाठीवर इकडून तिकडे गिरक्या घेत नुसता उडत फिरत असतो ! ह्यालाच म्हणतात वार्धक्य !

आमचे सोमेश्वर आयुष्यांतल्या ह्याच टप्प्यावर येऊन उभे राहिले आहेत. ह्या सोमेश्वरापेक्षां मी स्वतः वयानें थोडा लहान आहें हें जरी खरं, तरी आम्हा दोघांमध्यें मित्रत्व प्रस्थापित होण्याला त्यामुळें बाधा आलेली नाहीं. तशी बाधा उत्पन्न होण्याजोगं कारणहि नाहीं. साधारणपणें आमच्या दोघांमध्यें ज्या तऱ्हेच्या गप्पागोष्टी नेहमीं चालत असतात, त्या इतक्या साध्या अन् सोज्वळ स्वरूपाच्या असतात, कीं गुरुशिष्यांच्यामध्यें सुद्धां त्यांची देवाण-घेवाण व्हायला कांहीं हरकत नसावी. आमच्या तरुणपणीं कांहीं आमची एकमेकांशीं ओळख नव्हती. आमचे दोघांचे मार्ग भिन्न होते, आमचे विचार अन् मतं सुद्धां, मला वाटतं, निरनिराळ्या दिशेनें जाणारीं असावींत. पण म्हातारपण आलं म्हणजे सारेच एकाच जागीं येऊन उभे राहातात. त्या जागेवर उभें राहून पुढें दृष्टी टाकली म्हणजे पुढें एकच

परिणाम डोळ्याला दिसूं लागतो. सोमेश्वर अन् मी, आम्हा दोघांच्या नजरेपुढें तोच एक शेवटचा अवश्यंभावी, अटळ परिणाम स्पष्टपणें दिसायला लागलेला आहे आज !

सोमेश्वराबद्दलची सारी माहिती मला पूर्णपणें आहे. पूर्व-बंगालच्या एका जिल्ह्यांत त्यांची मोठी थोरली जमीनदारी आहे. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, आर्थिक ओढघस्तीच्या ह्या आजच्या काळांत सुद्धां त्यांची आवक अगदीं भरपूर प्रमाणांत आहे. सोमेश्वरांच्या घराण्यांत वंशपरंपरेनें 'राजा' ही उपाधि चालत आलेली आहे. त्यांच्याबद्दल मला माहिती आहे ती एवढीच. ह्यापेक्षा अधिक माहिती त्यांच्याबद्दल करून घेण्याची उत्सुकताहि कधीं माझ्या मनांत उत्पन्न झाली नाहीं. अशा मोठ्या जमीनदाराच्या मुलाच्या व्यक्तिगत जीवनासंबंधीं जाणून घेण्यासारखं विशेष असं कांहीं असतहि नाहीं ! हातीं भरपूर खेळता पैसा, अन् त्यापेक्षांहि अधिक वेळ ! अशा स्थितींत माणसाच्या आयुष्यांत ह्या एकच एक गोष्टीची पुनरावृत्ति सोडून दुसरें काय असणार ?

आमच्यासारखीं,—म्हणज म्हातारीं माणसं चंचल नसतात. आयुष्यांतलं सारंच कार्य जवळ जवळ संपलेलं, आणि शिल्लक उरलेला काळ सुद्धां अगदीं थोडा ! जे कांहीं थोडे-फार दिवस उरले असतील आयुष्यांतले, ते गीता पाठ करण्यांत अन् गुडगुडी ओढण्यांतच आतां जायचे ! अन् होत होतंहि तसंच. आम्ही दोघे बैठक जमवून बसलों म्हणजे कुरुक्षेत्रावरच्या युद्धाचं मूळ कारण कोणतं, त्यासंबंधीं आम्ही विचार करीत बसायचे, किंवा, लौकरच आपल्याला जीर्ण झालेल्या वस्त्राप्रमाणें ह्या देहाचा त्याग करून पुन्हा नवीन कलेवर धारण करून, नव्यानें कर्मक्षेत्रांत अवतीर्ण व्हावं लागणार, त्याचा विचार करीत असायचे ! 'मा फलेषु कदाचन ।' जाऊं द्या झालं ! कितीतरी कष्ट सोसल्यानंतर कुठें आम्ही आतां यौवन काळ ओलांडून इथपर्यंत येऊन पोहोचलों आहोंत. त्या तारुण्याच्या काळांत, कुठचे एक एक

प्रश्न अन् समस्या येऊन जीवनांत गर्दी करून समोर येऊन उभ्या राहत असतात माणसाच्या, भगवान जाणे ! त्या प्रश्नांनीं अन् समस्यांनीं आमचा कांहीं थोडाथोडका छळ केलेला नव्हता, हें कांहीं खोटं नाहीं ! पण, कांहीं असो, आतां तें सारं संपलं, हेंहि तितकंच खरं ! आतां आमची जीवन-सरिता स्तिमित, तरंगहीन बनली आहे ! आतां आम्ही डोळे मिटून घेऊन स्वस्थपणें अतीत काळाकडे पहात बसूं शकतों. सोमेश्वर त्या दिवशीं बोलतां बोलतां म्हणालेच होते ना, माणसांच्या शहाणपणाचा इतिहास म्हणजे त्याच्या मूर्खपणाचं इतिवृत्त ! मी म्हणालों तेंच त्यांनाहि सुचवायचं असावं, मला वाटतं.

सारा दिवस तर कसाबसा निघून जातो माझा; पण तिसरा प्रहर अन् संध्याकाळचा वेळ मात्र जातां जात नाहीं. कां असं होतं, तें सांगतां येणं कठिण आहे; पण होतं मात्र खरं तसं. अन् मग दिवसाची ही वेळ आली कीं वाटायला लागतं,–एक सोमेश्वर सोडले, तर माझ्या मनाला पटेल असा दुसरा माणूस मिळणं अशक्यच आहे उभ्या जगांत ! आज कालच्या तरुण पोरांबरोबर गोष्टी बोलत बसायला मंन घेत नाहीं. ते किती झालं तरी, आमच्याच पावलावर पाऊल टाकणारे, आमचंच अनुकरण करणारे, आमचे अनुगामी ! ही तरुण पिढी म्हणजे जुन्या कादंबरीची आधुनिक, नवी, पुनर्मुद्रित आवृत्ति ! जुन्या-पुराण्या गोष्टी आलटून-पालटून, द्राविडी प्राणायाम करून सांगायला बसले, कीं हे लोक स्वतःच गोंधळ निर्माण करून प्रश्न अधिकच कठिण करून सोडतात. ह्यामुळें असल्या तरुण पिढींतल्या लोकांशीं गोष्टी बोलत बसायला लागलं, कीं वाटायला लागतं काय बोलायचं ह्यांच्याशीं ?

म्हणूनच आपला सोमेश्वराजवळ घटकाभर जाऊन बसतों झालं. बरं वाटतं तिथें मला. जुन्या जमान्याच्या श्रीमंती थाटाला अनुसरून त्यांचा दिवाणखाना सजविलेला आहे. तिथं गेलं कीं नबाबी

अंमलाची साक्ष आजहि तो प्राचीन वाडा पदोपदीं पटवीत असतो. त्या विस्तीर्ण दिवाणखान्यांत एक तशीच उंची सतरंजी अंथरलेली, ठिकठिकाणी गालीचे, लोड, वगैरे वगैरे.

त्या दिवशीं मी जाऊन बसलों, तसे सोमेश्वर म्हणाले, " आज इतके लवकर कसे आलांत ? "

डोक्याचे केस पांढरे झाले, तेव्हांपासून आडपडदा न ठेवतां साऱ्या गोष्टी अगदीं स्पष्टपणें बोलून टाकायला मी शिकलों आहें. मी सांगून टाकलं सोमेश्वरांना, " म्हटलं घरीं बरं वाटेना, म्हणून आलों निघून झालं ! "

" कां बरं ? कांहीं विशेष ? "

" अहं ! तसं विशेष असं कांहीं नाहीं. तुमच्या घरच्या ह्या हुक्क्याचा मोह फार जबरदस्त आहे, हेंच कारण, दुसरं कांहीं नाहीं. गीतेंत भगवंतांनींच सांगितलं आहे ना, आसक्तीमुळें बंधन निर्माण होतं म्हणून ? त्याशिवाय, तुम्हाला ठाऊक आहे कीं नाहीं कोण जाणे, पण तुमच्या तोंडून गोष्टी ऐकत बसायला मला फार आवडतं. "

सोमेश्वर म्हणाले, " छान ! हो, बरी आठवण झाली. तुमच्या-साठीं मी एक कादंबरी काढून ठेवली आहे, पहा. "

मी मधेंच म्हणालों, " हात जोडतों बाबा, पण एवढं मात्र सांगू नका मला ! महाभारत वाचायला लागल्यापासून मी फिक्शन वाचायचं टाकून दिलं आहे. अगदीं नकोसं वाटतं मला तें ! ही आजचीच गोष्ट सांगतों तुम्हाला. कुठलंसं एक मासिक चाळीत बसलों होतों मी. त्यांत एका विख्यात लेखकानें लिहिलेली एक गोष्ट वाचली. गोष्टीचा विषय आपला नेहमींचाच होता– "

" कोणता ? "

"प्रेम ! दुसरा कोणता असणार विषय ? पण मला म्हणायचं आहे तें त्या लेखकानं तो विषय घेतला त्याबद्दल नाहीं. मी ती गोष्ट वाचून पाहिली, अगदीं मोजून काढलं पहा. पात्रांच्या संभा-

षणांत लेखकानें 'पण' हा शब्द सत्तेचाळीस वेळां वापरला आहे! जाऊं द्या, सोमेश्वर! ह्या असल्या गोष्टी-कादंबऱ्या वाचायला आपण आता तयार नाहीं बुवा! प्रेमावर गोष्ट लिहायची, अन् तींत इतके पुष्कळ 'पण' अन् 'परंतु' छे, छे, छें! आपल्याला नाहीं हें सहन करवत बाबा!"

मी इतका तापून, तावा-तावानें बोलत होतों; पण माझ्या संतापाची कोणतीच चाहूल सोमेश्वरांच्या मनावर उमटलेली मला आठवली नाहीं. तशी चाहूल मला त्यांच्याकडून कधींच मिळाली नाहीं. त्यांचा स्वभावच असा होता. कोणत्याहि प्रकारच्या उद्वेगानें त्यांच्या प्रशांत मुद्रेवरची प्रसन्नता विचलित झालेली मी कधीं पाहिलीच नाहीं! दिवाणखान्यांतल्या लँप-स्टँडवर मेणबत्तीच्या आकाराचा दिवा तेवत होता. त्या दिव्याच्या कोमल, मृदु प्रकाशांत मी पाहिलं, ते आपले डोळे मिटून बसले होते! त्यांची ही सवयच होती. अत्यंत महत्त्वाची, आवश्यक अशी टीका-टिप्पणी सुरू झाली रे झाली, कीं त्यांना आपले डोळे उघडे ठेवणं जमायचंच नाहीं कधीं! त्यांच्या डोळ्यांवर मग झांपड येऊं लागते. ह्या प्रसंगींहि, त्यांचं पाहून मलाहि आपले डोळे मिटून घ्यावे लागले!

कांहीं वेळानंतर त्यांचा स्वर पुन्हा कानांवर आदळला, अन् मी माझे डोळें उघडले. ह्या मधल्या वेळांत नोकर सोमेश्वरांच्या पुढ्यांत, तिवईवर व्हिस्कीनें अर्धा भरलेला पेला ठेवून गेला होता. जवळच सोडा-वॉटरची बाटलीहि ठेवलेली होती. सोमेश्वरांनीं नियमाबरहुकूम पेल्यांत सोडा ओतला, आणि शेंकडा नव्वद जमीनदार पुत्र ज्याप्रमाणें तो ओंठाला लावतात, त्याप्रमाणें त्यांनींहि आपला पेला रिकामा केला. सोमेश्वरांची कल्पना असावी, मी ह्या भानगडींतला नाहीं! माझ्या संबंधीं तऱ्हेतऱ्हेच्या कल्पना करून ठेवल्या आहेत लोकांनीं!

व्हिस्की पोटांत गेली कीं सोमेश्वरांच्या हृदयांत भाव जागे

व्हायला लागतात हें मी नेहमीं पाहिलं आहे. खरोखरीच, असा धीर-गंभीर पुरुष मी दुसरा पाहिला नाहीं. हळू हळू ते मृदु स्वरांत बोलूं लागले. म्हणाले, "तुम्ही मघाशीं म्हणालांत ना, तें अगदीं खरं आहे. प्रेमाचं चित्र रेखाटतां येणं खरोखरीच फार कठीण आहे!" एवढं बोलून ते गप्प बसले.

पण, मला वाटलं, सोमेश्वर गप्प बसले, तेंच बरं झालं. हा विषय फारसा पुढें न गेलेलाच बरा, नाहीं का? ह्या म्हातार-पणांत प्रेमाच्या गोष्टी तोंडावाटें बाहेर काढावयाच्या, म्हणजे लाज वाटते माणसाला. आमच्या सारख्यांच्या करवीं ह्यापूर्वीच ह्या विषयाचं चर्वण पूर्णपणें होऊन चुकलं आहे. आतां त्यांच्यावर तोंड चालविण्याचा भार आजच्या पोरा-सोरांवरच! म्हणूनच वाटलं एकदां, आज हा विषय निघालाच नसता तर फार बरं झालं असतं. पोरसवदा मंडळीलाच पोरकटपणा शोभून दिसतो. मी आता तरुण थोडाच राहिलों आहें?

"अगदीं पुरातन काळापासून,— समजलं का?" सोमेश्वरांनीं डोळे उघडले होते, आणि ते बोलायला लागले होते, "अगदीं फार प्राचीन काळापासूनच, प्रेमासंबंधींचं हजार वेळां तावून सुलाखून पडताळून पाहिलेलं एक तत्त्व, एक प्रिन्सिपल, माणसाच्या मनांत ठाण मांडून बसलेलं आहे. त्या तत्त्वाच्या कसोटीवरच सर्व प्रेमाची परीक्षा नेंहमीं होत असते."

सोमेश्वरांनीं विषयाला अशी सुरुवात केलेली पाहिली आणि मला कसंसंच वाटायला लागलं. मनाला भारीच संकोचल्यासारखं झालं माझ्या, अन् त्याबरोबरच थोडीशी भीतीहि वाटायला लागली. मला ह्या असल्या गोष्टींची चर्चा करणं फारसं आवडत नाहीं, हें सोमे-श्वरांनाहि ठाऊक होतं. माझ्या मनांत, आंतल्या आंत भूमिकम्पाचे हादरे बसायला सुरुवात झाली! पुरुष आपले म्हातारपणचे शेवटचे दिवस घालवितात अर्थनीति, समाज-व्यवस्था वगैरे गोष्टींच्या

चर्चेत, अन् बायका म्हातारपण घालवितात धर्मचर्चेत किंवा पर-निंदेत ! हा ठरलेला नियम आहे. जीवनांतल्या साऱ्या पायऱ्या एक एक करून, मी आणि सोमेश्वर, आम्ही दोघेंहि चढून वर येऊन चुकलों आहोंत. आतां जुन्या काळची पुनरावृत्ति करणं मनाला प्रशस्त वाटत नाहीं. आतां ह्या वयांत आम्ही जाणून ठेवलं आहे कीं जीवनाच्या बाबतींत सर्वश्रेष्ठ आशीर्वाद जर कोणता असेल आमच्या, तर तो फक्त मृत्यूच ! कारण, आम्ही आतां संपलों आहोंत ना !

पण सोमेश्वर पुढें सांगूं लागले, म्हणाले, " आज तुम्हाला एक गोष्ट सांगणार आहें मी. "

" कसली गोष्ट ? "

" गोष्ट आहे माझ्याच आयुष्यांतली !–माझ्या तरुणपणच्या काळांतली. " एवढें बोलून त्यांनीं पुन्हा आपले डोळे मिटून घेतले.

मी मनांत म्हटलं,—हरे राम ! जें नको म्हणत होतों, तेंच झालं शेवटीं ! गेंडूळ समजून ज्याला पायांखालीं चेंगरायला गेलों तो आज निघाला साप ! सोमेश्वर सांगणार आपल्या तरुणपणची गोष्ट ! तरुणपणांतली, माणसाला प्रेमाशिवाय दुसरी कोणती सांगण्यासारखी गोष्ट असूं शकते ? भावी काळांत आपल्या इकडे प्रेमाच्या गोष्टी अन् कादंबऱ्या थोड्या अधिक वाचण्याजोग्या होतील, निदान आजच्यासारखी, त्या काळांत तरी, मासिकांचीं पानं उलटतांना मनाची भयग्रस्त अवस्था होण्याचं कारण उरणार नाहीं, अशी आशा अधून–मधून माझ्या मनांत डोकावल्यावांचून मात्र राहत नाहीं, एवढं खरं. ह्या अपेक्षेच्या मुळाशीं कारण कोणतं विचाराल, तर तें हेंच कीं आज–काल, मी पाहतों आहें, आपल्या इकडे कॉलेजांतून वगैरे मुलं अन् मुली एकमेकांबरोबर राहूनच शिकाव्यात असा प्रयत्न जोरांत सुरू झाला आहे. त्यामुळें स्त्रिया आणि पुरुष दोघांचींहि मनं कांहींशीं विशुद्ध बनतील, आत्मज्ञान

त्यांच्या ठिकाणीं जागं होईल, असं मानायला हरकत नाहीं. मागें एकदां ह्याच विषयावर बोलतांना सोमेश्वर म्हणाले होते, लवकरच असा दिवस उगवेल, जेव्हां आमच्या इकडच्या विद्यालयांचं बहिर्मुखी रूप राहील शिक्षण-केन्द्राकडे आणि त्याचं अंतर्मुखी रूप होईल प्रजापति-संघ ! तो दिवस आमच्या तरुण कथा-लेखकांसाठीं विशेष भाग्याचा सुदिनच उगवला असं म्हणावं लागेल. पण ह्या झाल्या पुढच्या गोष्टी. आज तर....

प्रशांत दृष्टीनें माझ्याकडे पाहत सोमेश्वर म्हणाले, "आपलं राहतं गांव सोडून मी त्या वेळीं प्रथमच शहरांत आलों होतों. एका गरीब स्थितींतल्या गृहस्थाच्या एका मुलीशीं माझी ओळख जुळून आली. ही आमची ओळख झाली कशी, त्याबद्दल उगाच तर्क-वितर्क लढवून बारकाईनें चौकशी करण्याच्या भानगडींत तुम्ही पडूं नका. एकच सांगतों, माणसाला आंतून तगादा सुरू झाला म्हणजें सारा रस्ता आपोआप सोपा होऊन जातो. त्याशिवाय दुसरीहि गोष्ट आहेच ना एक. धनसंपन्न तरुणाशीं, दरिद्री गृहस्थ, सरळ, भर रस्त्यांतच ओळख काढून गोष्टी बोलायला लागतात, हें मी काय तुम्हांला सांगायला हवं ? "

संकोचामुळें मला पुन्हा कससंच वाटायला लागलं. ह्यापुढें ह्या वृद्ध जमीनदाराची यौवनकाळांतली ही गोष्ट कोणतं रूप धारण करील त्याची थोडी-फार कल्पना मी करूं शकतों. मी हळूंच बांकड्या नजरेनें अंतःपुरांकडच्या दाराकडे पाहून घेतलें. न जाणो, आमच्या इकडे ह्या गोष्टी सुरू असाव्यात, अन् नेमकं त्याच वेळेला आंतून कोणीतरी इकडे यावं, कीं झालंच मग ! ह्या म्हाताऱ्या वयांत एक आत्मसन्मान सोडला तर आमच्याजवळ दुसरं उरलंच आहे काय, सांगा ? दुसऱ्या कशाचा आहे आम्हाला आधार अन् भरंवसा ? मी घाईघाईनें सोमेश्वरांना मध्येंच थांबवीत म्हणालों, "पुरे आतां, सोमेश्वर ! आज आतां इतकंच पुरे. तुमची गोष्ट काय असेल ती

माझ्या लक्षांत आली आहे. पुष्कळांच्या अनेक तऱ्हेच्या गोष्टी मनांतल्या मनांत दडलेल्या असतात. साऱ्याच का कुठें कोणी उघड करून दाखवतं ? आतां पुढें कांहीं सांगू नका आणखी. आंत, घरांत पोरंबाळं आहेत. पुरे झाली तुमची गोष्ट. "

सोमेश्वर हें ऐकून नुसते हंसले. त्यांच्या या हंसण्याचा अर्थ, त्यांना आपली गोष्ट उघड उघड बोलून दाखविण्यांत कसलेंहि भय वाटत नाहीं, असाच होता. पण त्यांना नसलं तरी 'मला भय वाटतं होतं ना ! प्रेमाबद्दलची गोष्ट सांगण्याचा जो अर्थ मला समजूं शकतो, ह्यांत ना कुठं प्रेम असतं, ना असते गोष्ट ; त्यांत असतात फक्त ज्या कोणी कधीं प्रगट करूं नयेत अशा अप्रकाश्य, सूचक भानगडी ! प्रेमासंबंधीं निरासक्तीचं, वार्धक्याचं विशिष्ट लक्षण अन् रूप असतं. मी आज ह्याच ठिकाणावर येऊन दाखल झालेलों आहें. गीतेंत भगवंतानें सांगितलं आहे, मनुष्याचं प्रेम दैहिक आसक्तीनें आच्छन्न झालेलं असतं. निसर्गरम्य सृष्टीचं प्रयोजन सिद्ध करण्यासाठीं तें एक नाटक असतं ! मला खरोखरीच नवल वाटतं माझंच, गीतेचं अध्ययन करण्याच्या अगोदरच, गीतेंतली कितीतरी अशीं तत्त्वं मला चांगलीं ठाऊक होतीं !

सोमेश्वरांनीं विचारलं, " गोष्ट ऐकायची तुमची इच्छाच नसली तर गोष्ट निराळी ! "

मी म्हणालों, " हें पहा. उगाच स्वतःची फसवणूक करण्यांत काय अर्थ ? मी खरं तेंच सांगतों. ऐकावं असं फार वाटतं मला, खरं आहे. तरी पण, एक गोष्ट आहे पहा, सोमेश्वर ! आजच मी एका स्वनामधन्य लेखकानें लिहिलेली एक कादंबरी वाचली पहा. कोणा एका तरुणानें एका तरुणीवर प्रेम केलं एवढी गोष्ट सांगायला त्या सद्‌गृहस्थानें पुरीं शंभर पानं खर्चीं घातलीं आहेत ! सोमेश्वर, तुम्हीच सांगा. उंदीर पकडायला मांजराला कितीसा वेळ लागतो ? "

" हूं ! – मला वाटतं ह्या उंदीर मांजराच्या झटापटीसाठीं लाग-

णाऱ्या वेळावरच आजकाल साहित्याचा सारा कारभार चालू आहे. तें जाऊं द्या. तुम्ही माझी ही गोष्ट ऐका. माझ्या गोष्टींत काळाचा अपव्यय झालेला तुम्हाला आढळणार नाहीं. अन् मला वाटतं, तुमच्या त्या साहित्यांतली कथावस्तु, विषय वगैरेहि यांत सांपडणार नाहींत."

ऐकून मला आश्चर्य वाटलं. जो साहित्याचा विषय नाहीं असा प्रसंग घेऊन त्याची गोष्ट सांगण्याची इच्छा सोमेश्वराच्या मनांत ह्या प्रवीण वयांत उत्पन्न तरी कशी झाली, मला कळेना ! हा ह्या व्हिस्कीचा तर प्रभाव नसेल ? पण तसं म्हणावं तर, मला ठाऊक आहे, दारूची धुंदी सोमेश्वरांच्या डोक्यांत कधीं चढत नाहीं. आजच तर त्यांना ती चढली नसेल ?

नोकर आला आणि त्यानें हुक्का तयार करून पुढें ठेवला. मी नळी तोंडांत धरली.

सोमेश्वर सांगूं लागले, "घाबरण्याचं कारण नाहीं तुम्हाला. ऐका माझी गोष्ट. जर कुठें तुम्हाला अश्लीलतेचा वास आला तर हुक्का जरा जोरजोरानें ओढायला लागत चला, पण मी सांगत असतांना मला मधेंच अडथळा करूं नका. गीतेंत सांगितलेलं लक्षांत आहे ना ? निग्रह करूनच आत्मशुद्धी होत नसते. बुद्धि आणि ज्ञानाच्या मार्गानें विचाराच्या द्वारें संयम प्राप्त होत असतो."

"हं ! "

"माणसाच्या चारित्र्याच्या अगदीं खालच्या पातळीवर कितीतरी प्रवृत्ति गोळा झालेल्या असतात. मी जेव्हांची ही गोष्ट सांगतों आहें, त्या वेळीं मी त्याच प्रवृत्तीच्या तुफानांत सांपडून गिरक्या खात होतों. आणि अशा वेळीं माझ्या समोर येऊन उभी राहिली ती दरिद्री गृहस्थाची मुलगी ! तिचं नांव होतं मृणाल. शरीरसौष्ठव आणि देहाचं ऐश्वर्य भरपूर होतं, पण होती ती कुरूपच. दुःखी जीवन होतं बिचारीचं. लग्न लागलं आणि तेव्हांपासूनच तिचा नवरा कुठें निघून

गेला तिला सोडून, तो पुन्हा कांहीं परत आला नाहीं. सौभाग्याचं खरंखरं कुंकू तिच्या कपाळावर कधीं लागलंच नाहीं. विवाहित असूनहि ती कुमारीच राहिली ! एके दिवशीं मृणाल मला म्हणाली, ' ते कां पळून गेले मला टाकून, ठाऊक आहे तुम्हाला ? '

" 'अहं. तूंच सांग, कां ? '

" 'मी दिसायला ही अशी विद्रूप आहें म्हणून. किती झालं तरी ते होते चांगल्या, सभ्य घरांतले, शिकले-सवरलेले. सौंदर्याची ओळख त्यांना पटलेली होती. आवड अन् अभिरुचीहि त्यांना होती. माझ्यासारख्या विद्रूप मुलीला ते सोडून निघून गेले ह्यांत आश्चर्य नाहीं.--आजदेखील माझ्या मनाला त्यांच्याबद्दल आदरच वाटतो. '

" ती असं बोलायला लागली म्हणजे मी गप्प बसायचा. आजकालच्याप्रमाणें त्या काळांत स्त्री-पुरुषांना फारसं स्वातंत्र्य नव्हतं. तरी, मी आपल्या घोडा-गाडींत तिला बरोबर घेऊन बाहेर हिंडायला घेऊन जायचा. आम्ही दोघे तरुण, एकटेच,--पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, निसर्गाच्या खेळाला आमच्यामध्यें कुठें स्थानच नव्हतं. मी तसा जवान होतों, वयानें तरुण होतों, वंशपरंपरेनें कांहीं उच्छृंखलताहि माझ्यांत उतरली होती. पण काय असेल तें असो. ह्या मृणालच्या समोर मी एक निराळाच माणूस असल्यासारखं होऊन जाई. पुरुषाच्या लालसेचीं जीं जीं लक्षणं तुम्हाला ठाऊक आहेत, त्यांपैकीं एकहि लक्षण कधीं तिच्या सहवासांत माझ्या ठिकाणीं उत्पन्न झालं नाहीं. ती कुरूप होती, विद्रूप होती. पण तिच्या हृष्ट-पुष्ट देहांत असं कांहीं असामान्य ऐश्वर्य ठेचून भरलेलं होतं कीं काय सांगूं तुम्हाला. पण माझ्या प्रवृत्तीला आळा घालण्यासारखं कांहीं नसूनहि, तिच्या सान्निध्यांत मी निराळाच माणूस बनून जात असे हें मात्र खरं. एकदां ती मला म्हणाली, ' तुम्ही रात्रीं फार उशीरा घरीं परत जातां, खरं का ? कां लावतां एवढा उशीर ? '

" तसं म्हटलं तर तिचा माझ्यावर कोणताहि हक्क नव्हता असं

कांहीं विचारायला. तरीहि तिनं तो प्रश्न मला सरळ विचारलाच. मी तिला सांगितलं, ' म्हटलं कामं असतात बरीचशीं बाहेर. त्यामुळें उशीर होतो. '

" 'कसलीं असतात एवढीं कामं ?'

" 'हींच आपलीं, अशीच कुठें दोस्त मंडळींच्या भेटीगांठी, फिरायला जाणं, गाणं—बजावणं. '

" 'रात्रीं काय करतां ? '

" 'लिहिणं—वाचणं करतों. '

" मृणाल ह्यावर म्हणाली, रात्रीचे फार वेळ जागत जाऊं नका. एवढं माझं ऐका. फार उपकार होतील माझ्यांवर तुमचे ! मी सांगतें तें विसरूं नका. लक्षांत ठेवा, तब्बेतीला जपत असावं माणसानं. रात्रीं बेरात्रीं उशीरा येऊन जेवणं बरं नाहीं. वेळचे वेळींच सारं झालं पाहिजे, लक्षांत ठेवाल ना ?

" त्या दिवसापर्यंत असं कांहीं कोणी माझ्याशीं कधींच बोललं नव्हतं. माझ्या आवतीं—भोंवतीं नित्य गोळा होणारे जे कोणी माझे परिचित होते त्यांपैकीं एकानें देखील माझ्या जीवनांतल्या ह्या बाजूकडे ढुंकूनसुद्धां पाहिलं नव्हतं. माझ्या मनाच्या आंतल्या निभृत दालनांत त्यांच्यापैकीं कोणी एकानेंहि कधीं प्रवेश केलेला नव्हता. ते सारे माझे बाहेरच्या बैठकींतले अतिथि—अभ्यागतच केवळ असत. पण ही मृणाल मात्र सरळ आली अन् माझ्या अंतरांतल्या मणि-कोटरांतच शिरून बसली ! तिच्या पुढें माझ्या उच्छृंखल प्रकृति—स्वभावानें जणूं काय कुंठित होऊन आपलं मस्तक नम्र केल्यासारखं झालं! माझ्याहि ह्या शरीराची कांहीं किंमत आहे, मी जगलों वाचलों तर त्याला कांहीं किंमत आहे, अर्थ आहे, ही गोष्ट मला त्या दिवशीं जाणवली. अन् त्याबरोबरच दुसऱ्याहि एका, त्यापेक्षांहि अधिक विस्मयकारक गोष्टीची आवश्यकता मला त्या दिवशीं जाणवली. ती

ही कीं, त्या मृणालच्या जवळ बसून तिच्याशीं गोष्टी बोलत बसून राहाण्याची मला फार फार गरज आहे माझ्या जीवनांत !

" अन् एके दिवशीं मी तिला म्हणालों,–' मृणाल, मला तूं फार आवडतेस. माझं प्रेम बसलं आहे तुझ्यावर. '

" हें ऐकून मृणालनें एकदम दचकून माझ्याकडे पाहिलं. तिची ती नजर मला अगदीं स्पष्ट आठवते अजूनहि. एकाद्या पक्ष्याला अनपेक्षितपणें एकाएकी बाण लागावा म्हणजे त्याच्या डोळयांत जशी आशंका अन् व्यथा साकार होऊन उठते, तशीच तिची त्या वेळची नजर मला वाटली. कांहीं वेळानें ती म्हणाली, 'आज किती तरी दिवसांपासून मला वाटतच होतं, तुम्ही मला असं कांहींतरी ऐकवणार असं ! पण सोमेश्वर, माणसानें कधीं स्वतःची स्वतःच फसवणूक करून घेऊं नये, हें विसरूं नका तुम्ही. दुसऱ्याचं एक असो, पण स्वतःशीं तरी सच्चेपणा राखायला हवा. '

" मी म्हणालों,–म्हणजे काय ? तुला काय वाटतं, मी खोटं सांगतों आहें ? माझं तुझ्यावर प्रेम नाहीं ?

" फार मोठ्या विपत्तींत सांपडल्यासारखी होऊन मृणाल आपल्या आसपास, इकडे तिकडे पाहूं लागली. त्यानंतर ती म्हणाली, सोडा ह्या गोष्टी. आपण दुसरा कोणता तरी विषय काढूं या आतां. असं बोलतां बोलतां ती सरकून माझ्यापासून थोडी लांब जाऊन बसली. स्वतःच्या शरीरापासून मला चार हात लांब ठेवणं, हेंच जणूं कांहीं तिचं सर्वांपेक्षां अधिक महत्वाचं काम होऊन बसलं.

" कांहीं वेळ असाच निघून गेला. त्यानंतर मृणाल म्हणाली माझ्या मनांत काय चाललं असतं, ठाऊक आहे तुम्हाला ? मला सारखं वाटत असतं, एकसारखं रात्रंदिवस आपलं लक्षपूर्वक पाहत असावं, तुमचे रोजचे नित्याचे व्यवहार नीट धडपणें चालले आहेत कीं नाहीं तें. रात्रींच्या वेळीं तुम्हीं उघड्यावर तर झोंपत नाहीं

ना ? सर्दीबिर्दी झाली अन् आजारी पडलां तुम्ही, तर तुमची बास्त-पुस्त करायला मला तिकडे येतां यायचं नाहीं, ठाऊक आहे ना ?

"मी विचारलं, कां नाहीं येतां यायचं तुला ?

"ती म्हणाली, चारचौघांत तुमचं नांव बद्दू होईल, म्हणून.

"कोणी म्हणतील, प्रीतीचं हें स्वरूप अगदींच ग्राम्य आहे ! मला कबूल आहे तें. ह्या प्रेमांत बुद्धीनें उत्पन्न होणारी उज्ज्वलता नाहीं, पांडित्यामुळें उत्पन्न होणारं गांभीर्य नाहीं, कवित्वाच्या संसर्गानें तें हृदयग्राही बनवून सोडण्याचे प्रयासहि नाहींत. अगदींच साधं-सुधं, उघडं-नागडं, ग्राम्य होतं हें प्रेमाचं स्वरूप. ज्या समाजांत माझं येणं-जाणं असायचं त्याचं नांव होतं सुशिक्षितांचा समाज. पॉलिश केलेल्या सभ्यतेनें झळझळ करणारा तो समाज होता. त्या समाजांत पुष्कळशा सुंदर सुंदर रमणी वावरत असत. त्यांच्या दृष्टीनें मी आदर्श युवक होतों. ज्याच्या प्राप्तीचा लोभ त्यांनीं मनांत बाळगावा असा मी होतों, हेंहि मला ठाऊक होतं. आणि ह्या गोष्टीला यथायोग्य किंमतहि मी देत आलों होतों. पण ह्या मृणालच्या सहवासांत, त्या वातावरणांत वावरत असतांना मला एका अननुभूत प्रशांतीचा अनुभव होई. एका अनिर्वचनीय अध्यात्मिकतेच्या गंभीर जलाशयांत मी डुंबून निघत असें. मला वाटतं, हेंच होतं माझं खरं-खुरं स्वरूप. मृणालजवळ असं काय होतं ? सौंदर्य ? त्याच्यासंबंधीं तर अगोदरच मी सांगितलं आहे. मग काय, तिचा देह ? त्या देहाचं आकर्षण होतं मला ?—तिच्यापेक्षांहि अनेक पटीनें सुंदर अन् आकर्षक देह माझ्या आवतींभोंवतीं अगदीं मला सहज लभ्य स्वरूपांत किती तरी होते. नाहीं. तसं कांहींच मला मृणालबद्दल वाटत नव्हतं. माणसाची कामना ह्या असल्या गोष्टींपेक्षां अगदींच निराळी, फार मोठी असते. पुरुष शोधीत असतो रूपाच्या मधून रूपातीताला, देहाच्या मधून देहातीताला ! नुसत्या देहासाठीं किंवा रूपासाठीं ज्याची धडपड असते असं समजणाऱ्यांनीं, पुरुषाचं प्रेम ही काय वस्तु

आहे तें ओळखलेंच नाहीं, असंच म्हणावं लागेल. ह्या दोहोंच्याहि फार पलीकडच्या गोष्टीसाठींच पुरुषाची सारी धडपड असते ! ––" इतकें बोलून सोमेश्वर पुन्हा डोळे मिटून घेऊन स्वस्थ बसून राहिले.

मी म्हटलं, "अगदीं बरोबर आहे तुमचं बोलणं, सोमेश्वर ! ह्या एवढ्या स्पष्ट अन् सहज कळण्यासारख्या गोष्टीसाठीं तुम्ही आपल्या डोक्याला एवढा त्रास करून घेण्याचं कारण काय, म्हणतों मी ? अशा उंच पातळीवरच्या प्रेमाचीं उदाहरणं जगांत आढळतातच कीं, आणि, मला वाटतं, ज्या बायका आपल्या दिसायला अशा–तशाच असतात ना, त्या साधारणपणें अधिक जागरूक, जास्त सचेतन असतात. सर्वसाधारणपणें बायकांच्या ठिकाणीं जो स्वाभाविक दंभ अन् अहंकार असतो ना ––तो असल्या बायकांच्या बाबतींत बराचसा कमी प्रमाणांत आढळतो, सोमेश्वर."

" काय म्हणालांत, कमी प्रमाणांत असतो त्यांचा दंभ आणि अहंकार ?" डोळे उघडून माझ्याकडे पाहत सोमेश्वर म्हणाले, "अहो, एकदां काय झालं पहा. सोन्याचे कांहीं दागिनें मी विकत आणले, अन् ते मी मृणालला भेट म्हणून द्यायला गेलों. पण, काय सांगूं तुम्हाला ? ते पाहून तिची मुद्रा अशी कांहीं कठोर आणि उग्र झालेली दिसूं लागली कीं कांहीं विचारूं नका. तिनें अत्यंत स्पष्ट शब्दांत मला सांगून टाकलं. म्हणाली, ' सोमेश्वर, तुम्ही माझा अशा रीतीनं अपमान करूं नका ! तुम्ही मला अशी कांहीं भेट–बीट देण्याचा प्रयत्न केला कीं मला वाटायला लागतं, जीव द्यावा कुठेंतरी जाऊन ! हें सारं तुम्ही आपलं आणलं तसं परत घेऊन जा. माझी तुमच्याजवळ हात जोडून एकच मागणी आहे, तेवढी टाळूं नका ! तुम्ही माझ्यावर प्रेमहि करूं नका, अन् मला असल्या कांहीं भेटीहि देऊं नका ! तुम्ही मला असं कांहीं देण्यासाठीं घेऊन आलांत, कीं

मला वाटायला लागतं, त्याबरोबर तुम्ही मला देखील दूर करतो आहांत.'" इतकें बोलून सोमेश्वर पुन्हा गप्प झाले.

मी म्हणालों, "हुंऽऽ!--असेलहि! कोणी सांगावें? अशाहि कांहीं कुमारिका असतात. त्यांना वास्तविक वस्तुस्थितीपेक्षां काल्पनिक माया--मरीचिकाच अधिक आवडते. पुरुषांचा संसर्ग त्यांना मिळालेला नसतो; त्यामुळें त्या स्वतःच स्वतःला स्पष्टपणें पाहूं. ओळखूं शकत नाहींत. ह्याचा परिणाम मात्र असा होतो कीं, शेवटीं त्याच मुली महापुरांत वाहून जातात!"

सोमेश्वर म्हणाले, "चालूं द्या. तुमच्या मनांत जें कांहीं खरं आहे असं वाटत असेल, तें सारं बोलून टाका. मागें ठेवूं नका कांहीं बाकी. मी देखील तुमच्या प्रमाणंच तऱ्हेतऱ्हेनीं, सर्व बाजूंनीं विचार करून मृणालच्या व्यक्तित्वाचं विश्लेषण करण्याचा प्रयत्न केला होता. अनेक मार्गांनीं तिला स्वतःकडे आकर्षित करण्याचाहि प्रयत्न केला होता. पण काय सांगूं तुम्हाला? ती कोणतंच बंधन मानायला तयार नव्हती! ती दिसायला इतकी विद्रूप होती, म्हणूनच जसा कांहीं तिचा अहंकार इतका अधिक झालेला होता. तिची इतकी विलक्षण उपेक्षा सर्वांकडून केली जात होती, ह्याच कारणामुळें मला वाटतं तिचं व्यक्तिमत्व असं ठसठशीतपणें उमटून निघालेलं होतं कीं काय, कोण जाणे? त्या दिवशींची गोष्ट पुन्हा मला आठवते आहे आज. बाहेर खूप पाऊस पडत होता. त्या तशा पावसातच मी तिच्याकडे जायला निघालों. वाटेंत पावसानें भिजून ओलाचिंब होऊन गेलों होतों. पाण्यानें थबथबलेला मी तिच्यापुढें जाऊन उभा राहिलों. तशा अवस्थेंत मला पाहून मृणालला किती राग आला म्हणून सांगूं? पदरानें माझं कपाळ अन् तोंड पुशीत ती म्हणाली, 'असं कसं हो करतां तुम्ही? तुम्हाला कशाचंच कसं कांहीं वाटत नाहीं? ह्या अशा मुसळधार पावसांत कोणी घराच्या बाहेर

तरी पडतं का ? आला नसता आजचा दिवस, तर कोणाचं असं कोणतं नुकसान होणार होतं मोठं ?'

"मी उत्तर दिलं,–' काय बोलतेस मृणाल ? माझं अगदीं तुझ्या उलट आहे बघ. हे असे आभाळांत ढग भरून आले, पाऊस पडायला लागला, कीं मला तुझीच आठवण होत असते सारखी. मिस्टर दत्तांच्याकडे त्यांच्या मुलींनीं आज मुद्दाम निमंत्रण दिलं होतं. पाव-साचा रंग पाहून त्यांनीं ठरवलं होतं, आज मला वर्षाऋतूवरचीं तऱ्हेतऱ्हेचीं गाणीं गाऊन दाखवायचीं. पण मी त्यांच्याकडे न जातां तुझ्याकडेच आलों. अन् तूं मला हें ऐकवतेस ? '

"बाहेरच्या पावसाकडें पहात ती म्हणाली,– ' हंऽ ! तुमचे दिवस हे अशाच तऱ्हेनं वाया जात आहेत सारखे. तुम्हाला खरंखरं कोणी ओळखूंच शकेलेलं नाहीं आजवर त्या लोकांपैकीं. ह्या असल्या गोष्टी तुम्हाला आवडत नाहींत, रुचत नाहींत हें त्यांना अजूनहि कळत नाहीं ! ' त्यानंतर एकदम विषय बदलून ती म्हणाली,–' पण सोमेश्वर, तुम्ही त्यांच्याकडे खरोखरीच जायला हवं होतं. ज्यांना ज्यांना तुम्ही त्यांच्या जवळ असावं असं वाटतं, ती सारीच मंडळी मला आवडतात. खरं सांगतें तुम्हाला, जो कोणी तुमच्याबद्दल चांगले उद्गार काढतो, तुमची स्तुति करतो, तो मला माझ्या अगदीं आप्ता-सारखा वाटतो ! '

" मी मोठ्या स्नेहपूर्वक तिच्या पाठीवर हात फिरवायला गेलों, त्यासरशीं ती मागें सरकून माझ्यापासून लांब जाऊन उभी राहिली. म्हणाली,–' अंहं !–अंहं !–माझ्या अंगाला हात लावूं नका. तुम्ही असा हात पुढें करायला लागलां, कीं भीतीनं माझा थरकांप होतो अगदीं. तुम्ही माझ्या अंगाला हात लावला कीं, तुमचं मोठेपण ढळ-लंच म्हणून समजा. अन् तुम्ही आपल्या थोरवीपासून ढळून सर्व-साधारणांच्या कोटींत जमा झालांत जर, तर खरं सांगतें, त्या नुसत्या कल्पनेनंसुद्धां मला रडूं कोसळतं ! ' " सोमेश्वरांनीं हात पुढें

करून व्हिस्कीचा पेला उचलला अन् त्यांतली सारी व्हिस्की गळ्या-खालीं ढकलली.

मी म्हणालों, " मी आज म्हातारा झालों आहें, खरं आहे. पण माझ्या तरुणपणीं मी असल्या प्रकारच्या प्रेमाच्या कथा काव्य-साहित्यांत वाचल्या नाहींत असं नाहीं. त्या काळांत त्या आवडाय-च्याहि फार मला. नवल आहे मोठं ! –" इतकें बोलून मी गुडगुडीची नळी ओढूं लागलों.

सोमेश्वर पुढें सांगूं लागले, " जेव्हां जेव्हां अशी पावसाळी दिवसांत तिची माझी भेट होई, तेव्हां तेव्हां मला तिचीं बोलणीं ऐकून घ्यावीं लागत. सृष्टीचं रूप मेघांनीं असं झाकलं गेलं, म्हणजे स्त्री आपल्या प्रियकराला जवळ करण्यासाठीं व्याकुळ होऊन म्हणूं लागते—

येति नभीं घन दाटोनी ।
पाहूं रे किती वाट ? ॥
आतुरल्या व्याकुळ नयनीं ।
पाहूं किती रे वाट ? ॥ '

असं कांहीं तरी होत असतं, असं ऐकलं तरी होतं मी निदान. ही चिरंतन नारी अशा प्रसंगीं अभिसारिकेच्या रूपानें, खांचखळगे अन् कांटेकुटे तुडवीत, रात्रीच्या भयाण काळोखांत वेड्यासारखी वाट चालूं लागते, असंच ऐकलं होतं मी ! पण ह्या बाबतींत या तसल्या लोकोत्तर प्रेमाची व्याकुळता मला कधींच दिसली नाहीं ! उलट, मृणाल अगदीं स्पष्ट शब्दांत मला सारखी बजावीत सुटायची, म्हणायची, तुम्हांला माझ्या गळ्याची शपथ आहे, ह्या असल्या पाव-सांत तुम्ही घराबाहेर पडूं नका. पावसानें तुमचं आंग भिजेल, थंड वारा अंगाला झोंबेल. पाया पडतें मी तुमच्या, माझं एवढं ऐका. तुमच्या बऱ्यासाठींच सांगतें आहें मी हें.

" तिच्या म्हणण्याप्रमाणें मी वागलों म्हणजे त्यानेंच माझं भलं होणारं आहे, अशी तिची समजूत होती. माझ्याविषयीं तिची एकच प्रबळ इच्छा होती, माझं बरं व्हावं, कोणत्याहि तऱ्हेचे कष्ट मला कधीं होऊं नयेत ! अन्, नुसतं माझं शरीरच नाहीं, माझं मन देखील नेहमीं निर्मळ ठेवावं हेंच तिचं सर्वांत अधिक महत्त्वाच मोठ्ठं काम होतं तिच्या आयुष्यांत.

" मृणाल मधेंच कधीं कधीं मला विचारायची,–माझ्यासंबंधीं मनांतल्या मनांत तुम्ही भलतेसलते विचार तर करीत बसत नाहीं ना कधीं ? तिचा असला प्रश्न ऐकला कीं काय उत्तर द्यावं तेंच मला सुचेनासं होऊन जाई. त्या दिवशीं तिनें असाच प्रश्न मला विचारला, तेव्हां मी तिला उलट प्रश्न केला, भलतंसलतं म्हणजे काय, सांग तरी ?

" त्यावर ती म्हणाली,–म्हणजे, साधारण माणसं जसल्या गोष्टी मनांत आणतात, तसल्या गोष्टी ! माझी तुमच्याजवळ हात जोडून एकच मागणी आहे, सोमेश्वर. माझ्याजवळून तुम्ही उठून घरीं गेलांत कीं ताबडतोब तुम्ही माझ्यासंबंधींच्या साऱ्या गोष्टी अजोबात मना-बाहेर काढून टाकीत चला !

" 'असं कां करायला सांगतेस मला तूं, मृणाल ?'

" ती म्हणाली, 'तुमच्या शरीराला ज्यामुळें दुःख होईल, तुमचं मन व्याकुळ होईल, अशी कोणतीहि गोष्ट तुम्ही मनांत आणलां उपयोगी नाहीं !'

"एके दिवशीं ती म्हणाली, 'तुम्ही माझ्या जवळून निघून घरीं जातां अन् मग माझं मन तुमच्या मागोमाग भटकत राहतं, सारा दिवस मी तुमच्या प्रत्येक आचारांत अन् व्यवहारांत तुमच्या शेजारीं उभी असतें. तुमचं प्रत्येक काम पाहात असतें. अन् तुम्हाला झोंप लागली म्हणजे मग मी निश्चिन्त होऊन आपल्या ठिकाणीं येतें, जशी कांहीं.

" तिचं हें असलं सरळ सरळ बोलणं ऐकलं कीं मी आश्चर्यानें स्तंभित झाल्यासारखा होऊन जाई. मनांत येई, हें ही म्हणते तें खरं असेल का ? संभवनीय आहे का हें होणं ? ' प्रेम, प्रेम ' म्हणतात तें ह्यालाच का ? इथें चांचल्य नाहीं, कांहीं परत मिळावं अशी अपेक्षा नाहीं, दिल्याघेतल्याचा हिशोब नाहीं, कांहीं नाहीं. इतकंच काय, पण त्या गोष्टीचा मनांत विचार आला तरी मला नवल वाटतं, कोणत्याहि तिच्या आचार-व्यवहारांत काय कीं, संभाषणांत काय, कुठें भावनांची तुफान वेगाची घांवपळ कधीं नांवालासुद्धां सांपडायची नाहीं. असं प्रशांत रूप असतं ह्याचं ? आमच्या बाबतींत ज्योत्स्नापूरित रात्र अर्थहीन होती, दक्षिण वायु व्यर्थ होता, फुलांचा सुगंध, निसर्गाची शोभा, मेधमेदुर आकाश, हीं सारींच निव्वळ हास्यास्पद ठरलीं होतीं. असं सुस्पष्ट, निश्चल प्रीतीचं स्वरूप मी कुठंहि पाहिलं नाहीं. ह्या कुरूप, अजागळ मुलीसाठीं मी माझे मित्र सोडले, चार-चौघांत जाणं-येणं सोडलं, हंसत-खेळत मजेत दिवस घालवायचं सोडलं, सारं कांहीं सोडलं. तसंच म्हटलं तर ह्या साऱ्या गोष्टींची माझ्या भोंवतीं कांहीं कमी गर्दी नव्हती. मनांत आणलं असतं तर, मला कशाची उणीव होती ? धन-संपन्न बापाचा विलासी, तरुण मुलगा मी. माझ्या आवती-भोंवतीं चारी बाजूंनीं विलासोपभोग हात जोडून तयार होते.पण त्या सर्वांचा मी त्याग केला होता. ह्या प्रीतीनें त्या गोष्टींचा त्याग मला करायला लावला होता. माणसांची आसक्ति नाहीशी करून टाकणं, हेंच प्रीतीचं सर्वांत मोठं कार्य असतं कीं काय ?

" एके दिवशीं मी तिला म्हणालों, ' तूं अशी जेव्हां तेव्हां माझ्या बरोबर हिंडते फिरतेस मृणाल, लोक तुझ्याबद्दल वाटेल तशा गोष्टी बोलूं शकतात ! '

" मृणाल हंसली. ती म्हणाली, ' हं, बोलूं शकतात हें खरं; पण बोलत नाहींत ते.'

" मी विचारलं, बोलत नाहींत ? तुला ठाऊक आहे ?

" ती म्हणाली, हो. ठाऊक आहे मला.

" मी म्हटलं, अस्सं ! म्हणजे लोक मुद्दाम तुझ्या वागण्याकडे दुर्लक्ष करतात असा ह्याचा अर्थ. त्यांची तुला फूस आहे एक प्रकारें, असंच म्हणायचं ना ?

" मृणाल पुन्हा हांसली अन् म्हणाली, जें दुर्लक्ष करूं शकतात, फूस देऊं शकतात, ते माझ्या नांवाचा दुर्लौकिकहि करूं शकतात. पण खरं सांगूं का तुम्हाला ? सर्वांना चांगलं ठाऊक आहे, अगदीं खात्री आहे लोकांची, कीं कांहीं झालं तरी माझ्या हातून भलतं-सलतं, दुर्लौकिक होण्यासारखं कोणतंहि कृत्य कधीं होणं शक्य नाहीं !

" मी म्हणालों, 'असेल तसं. पण लोकांनाहि डोळे आहेत, त्यांना अक्कल आहे. सारं कांहीं दिसतं त्यांना, अन् कळतंहि. लोक म्हणजे काय ढेप अन् गवत खाणारीं जनावरं समजतेस तूं ? बोलले नाहींत ते, म्हणून काय झालं ?'

" 'ढेप अन् गवत न खाणाऱ्यांचा माझ्यावर पूर्ण विश्वास आहे, सोमेश्वर. पण त्यांच्या ह्या विश्वासाची किंमत चुकवण्याची मी कधीं धडपड करीत नाहीं. माणसाची मला भीति वाटत नाहीं.'

" मी म्हटलं, 'माझी वागणूक कशी आहे, माझं शील, माझं चारित्र्य कोणत्या किंमतीचं आहे, तें तुला ठाऊक आहे का ? तुला ठाऊक आहे, मी तुझ्या ह्या विश्वासाला अन् प्रेमाला पात्र नाहीं हें?'

" मृणालनें तोंड वर करून माझ्याकडे पहात विचारलें, कशावरून ?

" त्या दिवशीं मी अगदीं पूर्ण तयारी करूनच गेलों होतों. मी म्हटलं, 'माझं वर्तन, माझं चारित्र्य तितकंसं चांगलं नाहीं, ही गोष्ट तुझ्या कानीं आली नाहीं का ?'

" 'तें कळवून घेण्याची मला इच्छा नाहीं !' मृणालनें शांत, स्थिर स्वरांत उत्तर दिलं.

" इच्छा नसली तरी तुला तें कळवून घेतलंच पाहिजे ! असं म्हणून मी तिच्या शेजारीं, अगदीं तिला खेटून जाऊन बसलों, अन् माझ्याविषयीं तिला सांगू लागलों. तोंडावाटें एक शब्दहि न काढतां ती माझं सारं बोलणं मुकाटयानें, चिंताग्रस्त मुद्रेनें, ऐकून घेऊं लागली. ती सबंध संध्याकाळ मी तिला माझ्या स्खलन–पतनाच्या गोष्टी ऐकविण्यांत घालविली. इतक्या निष्कपट भावानें आडपडदा कांहीं एक न ठेवतां, मी माझ्या जीवनांतल्या त्या गोष्टी दुसऱ्या कोणालाहि कधीं सांगितल्या नाहींत. माझ्या अगदीं जीवश्च कंठश्च मित्राजवळहि ज्या गोष्टी बोलतांना मला अडचण वाटली असती, त्या साऱ्या गोष्टी मी तिच्याजवळ मात्र अगदीं नि:संकोच भावानें सरळ सरळ सांगून टाकल्या. ऐकून मृणाल रडूं लागली–अगदीं मुसमुसून रडूं लागली. जसं कांहीं मी तिला बाण मारून घायाळ करून टाकलं होतं, तिचं हाड अन् हाड मोडून काढलं होतं, तिच्या सर्वस्वाचा ठेवाच जणू काय मी नाहींसा करून टाकला होता ! त्या दिवशीं घरी परत चाललों असतां मला वाटलं होतं, चला, ठीक झालं ! वाचलों एकदांचा ! मीहि सुटलों, मृणालचीहि सुटका मी करून दिली ! माझ्याबद्दलचा तिचा सारा मोह, सारी माया आज नाहींशी झाली, बरं झाल ! धरणीकंपांत, तिनें उभारलेल्या हवेल्या गडगडून कोसळल्या; आतां ती आपल्या मार्गानें सरळ चालत जाऊं शकेल बिचारी ! वांचलों !

" कांहीं दिवस निघून गेले. आमची भेट त्या दरम्यान झाली नाहीं. पण एके दिवशीं तिच्याकडून निरोप आला. भेटायला बोलावलं होतं तिनें. गेलों मी. मला पाहून तिच्या मुद्रेवर जणू काय प्रकाश झळकायला लागला. म्हणाली, 'तब्येत बरी आहे ना ? रात्र–रात्रभर जागरणं करीत लिहिणं वाचणं करायचं बंद केलं कीं नाहीं ?'

" तिच्या प्रश्नांचीं उत्तरं न देतां मीच तिला उलट प्रश्न केला, ' पुन्हा बोलावणं पाठविलं आज ? कां बरं ? '

" ती म्हणाली,–' म्हणजे काय ? बोलवणं पाठवूं नको तर काय करूं ? या, आंत चला ना. थंडीचे दिवस ! कोण गारठा पडला आहे हा ! अंगांत गरम कां नाहीं घातलं कांहीं ? '

" तिला जवळ घेण्याची प्रबळ इच्छा माझ्या मनांत अनावर झाली. माझी ही इच्छा माझ्या मुद्रेवरहि स्पष्टपणें उमटली असावी. कारण, एकाएकीं गंभीर बनून मृणाल म्हणाली, ' माझ्याकडे असें पाहूं नका, सोमेश्वर ! अगदीं निर्भयपणानें मला तुमच्या जवळ बोलत बसूं द्या ! ' शेजारीं बसतां-बसतां ती म्हणाली, मधून- मधून तुमच्या-कडें पाहून,मला कीं नाहीं, भीति वाटायला लागते. कधीं वाटतं, तुम्ही चोर-दरोडेखोर आहांत, अन् कधीं वाटतं तुम्ही माझे खरे खरे मित्र आहांत! नुसत्या शरीरासाठीं धडपड करायची,ह्याचा अर्थ काय होतो, ठाऊक आहे तुम्हाला ? त्याचा अर्थ स्वत:चा विध्वंस करून घेणं. जो संयत, संयमनशील, तोच खरा बुद्धिमान ! ' सोमेश्वरांनीं पुन्हा डोळे मिटून घेतले.

नोकर आंत आला आणि त्यानें नवी चिलिम भरून आणून ती गुडगुडीवर ठेवून दिली. रात्र होत चालली होती. नव्या चिलमीं-तल्या गुडाखूचे दम मारीत मीं म्हटलं, " मी पाहिलं आहे, पुष्कळशा तरुणांच्या अन् तरुणींच्या बाबतींत असंच होतं. त्यांच्या स्वभाव-प्रकृतीची ठेवणच कांहींशी निराळी असते. पण सर्वसाधारणपणें एक ठोकताळा मी सांगून ठेवतों तुम्हाला. आदर्शाकडे, तत्त्वाकडे मुलींचा ओढा असतो त्यांचा पुरुषाशीं संसर्ग होण्यापूर्वी अन् पुरुषाचं नेमकं ह्याच्या उलट असतं. त्याची तात्त्विकता स्त्रीशीं त्यांचा संसर्ग घडून आल्यानंतर उफाळून बाहेर येते. हा स्त्री अन् पुरुषामधला एक मूळ भेद आहे. स्त्रीच्या चरित्रांतली खरी खरी

माधुरी तिच्या कुमारी अवस्थेंतच प्रत्ययाला येते. त्याच्या उलट, पुरुषाच्या चारित्र्याचं ऐश्वर्य त्याच्या विवाहानंतर दिसायला लागतं. .पण, मला वाटतं, तुमच्या ह्या मृणालची जात कांहींशी वेगळी असावी. गोष्टीवरून गोष्ट निघाली म्हणून आठवलं तें सांगतों. त्या वेळीं मी तरुणच होतों. केस पिकायला सुरुवात झाली नव्हती माझे तेव्हा. त्या वेळीं मी एक बाई पाहिली. दिसायला सुंदरच होती ती, अन् जशी स्वरूपांत तशीच वर्तनांतहि ! नांव ठेवायला जागा नव्हती तिच्या बाबतींत. पण, तिच्या स्वभावांत एक गोष्ट मात्र विचित्र होती. आपलं सच्चारित्र्य अन् आपलं सौन्दर्य जगांत मिरवीत राहून तरुण मुलांकडून आपलीं सुखं अन् स्वार्थ ह्यांची भरपूर पूर्ति करवून घ्यायची, हाच जसा कांहीं तिचा धंदा बनल्यासारखा झाला होता ! मधून-मधून तर तिचा हा स्वार्थ अगदीं उघडा-नागडा, पराकाष्ठेचा क्षुद्र, अन् परमावधीला पोहोंचलेला दिसायचा. स्त्री-पुरुषांच्या संबंधांची शास्त्रशुद्ध मीमांसा करणाऱ्या लैंगिक शास्त्रांत आहे ना ! सेक्स अपीलचा उपयोग करून मटीरिअल ॲडव्हान्टेज वसूल करून घेणं ? त्यांतलाच प्रकार होता तो. पण, तुमची मृणाल नक्कीच निराळ्या, श्रेष्ठ जातीची स्त्री असली पाहिजे. सुपीरिअर एलिमेन्ट म्हणतात ज्याला, त्यांपैकीं ! पण तें जरी खरं असलं तरी, तुमचं हें प्रेम देहातीत होतं, शरीराशीं किंवा शरीरधर्मांशीं त्याचा कोणत्याहि प्रकारचा कार्य-कारण-संबंध नव्हता, असं जर तुम्हाला वाटत असेल, तर तें मात्र बरोबर नाहीं, बरं का सोमेश्वर ! देहाशीं त्याचा संबंध आहेच. फक्त या प्रेमांत लालसा किंवा वासना नाहीं, एवढाच फरक ! प्रत्यक्ष वस्तूपेक्षां तिच्या सुगंधानेंच अधिक गुंगी चढावी, तशापैकींच कांहींसं ! इंग्रजींत ज्याला म्हणतात, नॉन-नॉर्मल, त्यापैकींच ! ”

सोमेश्वरांनीं हंसत हंसत डोळे उघडले. माझं एवढं विद्वत्ताप्रचुर भाषण ऐकूनच बहुधा त्यांना हसूं आलं असावं ! ते म्हणाले, “ हं !

तुमच्यासारखाच मी देखील, मृणाल ही काय वस्तु आहे हें जाणण्यासाठीं विज्ञानाचा अन् शास्त्रांचा आधार घेऊन प्रयत्न करीत असें. पण खरं सांगू का? माझी दृष्टि लागून राही ती, जीव ओतून माझ्याशीं तिचं जें वर्तन असे, त्याकडे! ह्या तिच्या व्यवहारांत लीलाहि होती आणि त्याचप्रमाणें धर्महि होता. नुसत्या बुद्धीच्या साह्यानें तिचं माप करता येणं शक्य नाहीं, त्याचप्रमाणें विज्ञान-शास्त्राच्या मदतीनें तिचं विश्लेषण करून ओळख पटेल म्हणावं, तर तेंहि अशक्यच. खरं सांगू का? ह्या साऱ्या शास्त्राच्या, बुद्धीच्या, विज्ञानाच्या, विश्लेषणाच्या गोष्टी आहेत ना? ह्या साऱ्या अगदीं एकांगी आहेत. माणूस, त्याचं व्यक्तित्व, ह्या गोष्टीऱ्या पलीकडचं असतं. शहाणपणाचा डौल मिरवून कोणी ह्या फूटपट्टीनें एकाद्या माणसाचं मोज-माप घेऊन सांगायला लागला कीं, हा बघा तुमचा 'माणूस!' हें ध्या त्याचं रूप, अंतरंगांतलं रूप! असा असा आहे तो! म्हणजे मला खरोखरीच हंसायला यायला लागतं! कारण काय तें सांगूं का? एकदां मतं प्रस्थापित करण्याचा अट्टाहास सुरू झाला कीं, मग वाद रंगत जातात, विवादहि रंगतात. पण त्या भाराखालीं जीवाचा सत्याचा मात्र कोंडमारा झाल्यावांचून राहत नाहीं. कोरडचा तर्क-वितर्काच्या ओझ्याखालीं हृदयांत उसळणाऱ्या आवेगांची नरडी दाबली जाऊं लागते. बुद्धीचे अन् तर्कयुक्तीचे हे वाचाळ राक्षस रस तत्वाचा यज्ञ उधळून टाकतात, त्याचा नाश करून टाकतात!"

मी म्हटलें, "वा! अगदीं हंसतां हंसतां आम्हाला तुम्ही राक्षस बनवून टाकलंत कीं!"

सोमेश्वर म्हणाले, "तसं नाहीं, राग मानूं नका तुम्ही. व्यक्तिशः तुमच्यासंबंधीं किंवा तुमच्यासारख्या माणसांसंबंधीं नाहीं मी बोलत. तुम्हाला वाईट वाटत असेल तर मी वाटल्यास असं म्हणेन कीं, तर्क अन् बुद्धीच्या प्रामाण्यावर माणसाचं व्यक्तित्व जोखण्याची ही

राक्षस-वृत्ति रसतत्वाच्या जाणिवेला मारक ठरते ! पुराणांतल्या यज्ञांचं, त्यांच्या संहार करण्याऱ्यांचं अन त्यांच्या संरक्षकांचं उदाहरण नुसतं उपमेपुरतंच वापरलेलं होतं मीं. त्यांत तुम्हाला वाईट वाटण्याचं कारण नाहीं खरोखरी. मला सांगायचं आहे तें एवढंच कीं, माणसाची त्यांच्या सजीव अन् संपूर्ण व्यक्तिमत्वाची ओळख ह्या मार्गानें होऊं शकत नाहीं. तसं करण्याचा अट्टाहास धरणं म्हणजे खऱ्या ज्ञानाच्या आनंदाच्या–जिवंतपणाच्या ज्ञानाला–स्वत:हि मुकणं आहे, अन दुसऱ्यांनाहि त्यापासून वंचित करणं आहे. तुमच्या ह्या पद्धतीनें फार झालं तर माणसाच्या हाडामांसाचं मोजमाप करतां येईल, त्यांची लांबी, रुंदी वगैरे ठरवतां येईल. पण त्यांच्या पलीकडचं जें चैतन्य, जें मनस्तत्व, जें सप्राण चैतन्य त्या माणसाच्या व्यक्तित्वाला प्रेरणा देत असतं, तें कधीं तुमच्या फुटपट्टीच्या मोजमापांत पूर्णपणें कधीं सामावूं शकेल का ? ”

“ पूर्णपणें सामावूं शकणार नाहीं, असं म्हणतांना तें कांहीं प्रमाणांत तरी सामावूं शकतं, हें तरी तुम्हाला मान्य आहे, एकूण ! ”

“ तेवढं देखील नाकारायला मी कांहीं एकादा अत्याग्रही किंवा एकांतिक वृत्तीचा दुराग्रही माणूस थोडाच आहें ? मला कबूल आहे, ढोबळ मतानें तुमच्या साऱ्या शास्त्रांच्या सहाय्यानें माणसाच्या मनाची गति ओळखतां येईल कदाचित् ! पण त्यांतहि पुष्कळ धोके आहेत, हें विसरूं नका. तुमच्या मार्गानें जाऊन केलेलं निदान हें अचूक बरोबरच असेल असं नाहीं. त्रिकालाबाधित, सर्वसामान्य असे सिद्धांत माणसाच्या मनाच्या बाबतींत लावतां येणं कठिण आहे, एवढंच मला म्हणायचं आहे. ”

“ जाऊं द्या तें. तुम्ही आपली गोष्ट पुढें सांगा, झालं. ”

“ तीच तर सांगतों आहें. म्हणूनच तर हा मुद्दा निघाला. एकदां मृणाल मला म्हणाली, ‘सोमेश्वर, तुमचं हित तेंच माझं हित समजतें

मी, ही गोष्ट कधीं विसरूं नका तुम्ही ! माझी हीच इच्छा आहे कीं माझ्या जीवांत जीव असेतोंपर्यंत तुम्हांला कुठल्याहि प्रकाराच्या दु:खाची झळ लागलेली मला पहावी लागूं नये ! तुमच्या सुखांतच माझं सुख, तुमच्या आनंदांतच माझा आनंद ! माझ्याबद्दल भलत्या कल्पना करून घेऊं नका तुम्ही. दुसरी कोणी मुलगी जर तुम्हाला सुखी करूं शकली, तुम्हाला आनंद देऊं शकली, तर तो आनंद माझाहि आनंद ठरेल हें पक्कं लक्षांत ठेवा !' "

आतां सोमेश्वर उत्तेजित स्वरांत पुढें बोलूं लागले, " म्हणणारे म्हणतात, बायकांची जात स्वार्थी असते ! मेली तरी कोणतीही स्त्री आपली जागा सोडायला तयार व्हायची नाहीं ! अन् तेंच मृणाल काय म्हणाली, तें पहा ! मग, आतां बोला, तसं म्हणणारे मिथ्यावादी नाहीं तर दुसरं काय आहे ? खरं सांगतों मी तुम्हाला, स्त्रीजातीविषयीं अशी समजूत बाळगण्यासारखी दुसरी चूक नाहीं. आज तुम्ही कुठल्याशा त्या लोकप्रिय प्रथितयश साहित्यिकानें लिहिलेली कोणतीतरी गोष्ट वाचल्याचं मघाशीं सांगत होता, आठवतं ना ? पण ह्या असल्या गोष्टींत अन् कथा–कादंबऱ्यांत वाचकांना खोटचा–नाटचा गोष्टी सांगून त्यांना भुलवून, गुंतवून ठेवण्यासाठीं स्वस्त जातीच्या रंगी–बेरंगी प्रीतीच्या चित्रावांचून काय असतं दुसरं? त्यांच्या साऱ्या गोष्टी, म्हणजे बांगडयांचा कणकणाट अन् पदरांचा फडफडाट, अन् त्यांच्या आधारानें चाललेले मनाचे चाळे ! काय काय असतं दुसरं त्यांच्यांत सांगा तुम्हीच ? मारे, मानसशास्त्रांचीं अन् सायको अनॅलिसिसचीं तत्त्वं सांगत सुटायचीं, अन् त्यांच्या क्लिष्ट, कठिण गांठी उकलण्यासाठीं ओढाताण करीत सुटायचं ! अधोगामी प्रवृत्तींना आपल्या लेखणीनें चाळवण्यापलीकडे, गुदगुल्या करीत बसण्यापलीकडे काय करतात हे तुमचे लेखक दुसरं ? मी आपलं एक मत सांगतों तुम्हांला. सांगण्यासारखं तर जवळ कांहीं नाहीं, पण ह्या दारिद्र्याला लुसलुशीत, हृदयग्राही शैलीच्या

ावरणाखालीं दडपून ठेवण्याचं कसब मात्र ज्यांच्या जवळ पुरेसं ाहे, अशा माणसाला 'लोकप्रिय' 'प्रथित-यश' कादंबरीकार बना-ला उशीर लागत नाहीं. अगदीं सहज बनून जातो तो मोठा, श्रेष्ठ ाहित्यिक ! कां, पटत नाहीं वाटतं तुम्हांला ? "

मी कांहींसा रुष्ट होऊन म्हणालों, " जाऊं द्या ना ह्या गोष्टी ! ांगली गोष्ट सागत होतां तुम्ही, सोमेश्वर. गोष्टीच्या वाटेंत तर्क त्तर्क अन् वादविवादाची झोळी पसरून कशाला बसतां उगाच ? ापली गोष्टच पुढें चालूं द्या तुम्ही ! "

सोमेश्वर पुढें सांगूं लागले, " प्रेमाच्या बाबतींत देखील एक चिर-ालीन नीति आहे. तिचं श्रेष्ठत्व फार मोठं आहे. जें खरे खरे ाणते, ज्ञानी आहेत, मनुष्याच्या जीवनाचं सांगोपांग अन् सखोल र्शन ज्यांनीं केलेलं आहे, अशांच्या विचार-बुद्धीनेंच तिला चिरंतन दावर प्रतिष्ठित केलेलं आहे. मृणालच्या ठायीं सुद्धां मला त्याच कारची जाणीव असलेली आढळून आली होती. ही जाणीव ाणसाला विचारानें अन् बुद्धीनें ठरवून स्वतःच्या ठायीं आणतां त नाहीं. ती एका एका माणसाची सहज प्रवृत्तीच असते, असं ला कधीं कधीं वाटायला लागतं. निदान, मृणालच्या बाबतींत तरी ी तिची जन्मजात प्रवृत्तीच होती हें निश्चित ! एकदां मला ाश्चर्यानें थक्क करून सोडीत म्हणाली,—' सोमेश्वर, तुम्ही मला ेटलांत. पण तुमच्यामुळें माझी मीच मला खरोखरी सांपडलें आहें ासं मला वाटतं. माझं मीपण काय आहे तें तुम्ही नसतां तर कधीं ाझं मलाच कळलं नसतं. तुमच्यामुळें मी स्वतःला ओळखलं आहे, ाणूं. शकलें आहे' तिचं असलं बोलणं ऐकून मला काय आठवलं ांगूं ? काव्यांत म्हणतात ना ? ' अपरिचित भ्रमरांच्या पदरेणूंमुळें नभूत नीलपद्माचा आत्मप्रकाश ! ' तसंच हें ! "

वयानें मी आतां म्हातारा झालेलों आहें. काव्य बिव्य सोसत नाहीं ातां मला ! तरुण असतों, तर सोमेश्वरांचे हे भावनांचे उद्रेक

अन् उसासे मला तितकेसे चीड आणणारे ठरले नसते, आतां त्यांचा उबग येतो ! पण काय करायचं ? चांदीच्या हुक्क्यांतून उंची अंबरी गुडाखु त्यांनीं मला ओढायला दिला होता ! अशा परिस्थितींत माझे हात-पाय बांधून त्यांनीं मला झोडपून काढलं, तरी सहन करणं प्राप्तच आहे मला ! उपकाराचं ओझं म्हणून म्हणतात ना ? त्या उतार वयांत साधी गोष्ट सहजपणें सांगितली कीं ती सरळपणानें समजून घ्यायची, अशी संवय करून घेतली होती मी आणि म्हणूनच, हजार मत मतांतरांचा गलबला ऐकूनहि शेवटीं माझ्या या बाबतींत एकच निर्णय पक्क ठरला होता, तो हाच कीं, तुमच्या प्रेमाचीं तुम्ही वाटेल तशीं भव्योदात्त वर्णनं करा, पण सर्वांचा परिणाम शेवटीं एकच ठरलेला आहे. निसर्गाची हाक ऐकणं, त्या हांकेला 'ओ' देणें, हीच सर्व प्रकारच्या प्रेमाची शेवटची परिणति अगदीं ठरलेली आहे. प्रकृतीचीं अन् स्वभावाचीं तऱ्हेतऱ्हेचीं मायावी रूपें, नीलपद्म किंवा लाल जास्वंदीच्या उपमा, किंवा आणखी अशाच कल्पनांच्या आवरणात त्याचं स्वरूप बदलणं किंवा त्याला फसविणं अशक्य आहे ! वास्तविकाकडे पाठ फिरवून केवळ कल्पनेच्या आभासमय सृष्टींत विहार करणाऱ्या अज्ञानी, महामूर्ख स्त्री-पुरुषांनींच आपल्या मनानें कल्पनेचीं जाळीं विणून असल्या गोष्टींचा जगांत प्रचार केला आहे. वस्तुस्थितीशीं समोरासमोर येऊन तोंड देण्याचा प्रसंग आला, म्हणजे असल्या भ्रामक समजुतींचा फोलपणा अनुभवाला आल्यावांचून मात्र राहत नाहीं. माझा असाच विश्वास होता. पण सांगायचं कोणाला ? सोमेश्वरांपुढें हें सारं बोलण्याची माझी ताकद होती का ? ते जें कांहीं बोलतील तें सारं, मनाला पटत नसलं तरी, ऐकून घेणं मला प्राप्तच होतं ! ते श्रीमंत पडले, अन् मी त्यांच्या उपकारांनीं दडपलेला !

सोमेश्वर पुढें सांगूं लागले. ते म्हणाले, "एकदां अशीच गंमत झाली. एकदां, तिला न सांगतांच, मी माझ्या एका स्नेह्याबरोबर

बाहेरगांवीं निघून गेलों. बरेच दिवस प्रवासांत घालविले. त्रासहि पुष्कळच झाला होता. त्यामुळें परत आलों तों आजारी पडूनच. माझी ती दशा मृणालनें पाहिली मात्र अन् तिचे डोळे थिजल्यासारखे झाले. ती म्हणाली, अगदीं पिसाटाप्रमाणें उंच स्वरांत किंचाळत बोलली ती, 'हें असलं कांहीं तरी होणार, हें ठाऊक होतं मला! तुम्ही गेल्याचं कळलं, अन् त्या रात्रीं मला तें भयंकर स्वप्न पडलं ! तेव्हांच माझ्या छातींत धस्स् झालं ! लागलीच मी अंबाबाईला नवस केला होता. अन् म्हणून तुम्ही आज, अशा अवस्थेंत का होईना, पण पुन्हा मला दिसलात तरी ! माझं न ऐकतां तुम्ही मन मानेल तसे वागायला लागलांत, तर तुमची धडगत नाहीं सोमेश्वर! तुम्हाला कसं पटवून देऊं मी ? पण मी सांगतें त्याच्यावर विश्वास ठेवा. तुमच्यावर येणारीं सारीं संकटं आणखी विपत्ति मीच ढालीसारखी रोखून धरीत असतें, तुमच्यापर्यंत त्यांना येऊं देत नाहीं. तुमचा तो कोण मित्र का कोण आहे तो, त्याच्यामुळेंच तुम्हाला हे सारे कष्ट सोसावे लागले. तोच असला पाहिजे ह्या सर्व त्रासांचं मूळ ! खरं ना ? '

"मी खरं तें कबूल करीत म्हणालों, ' झाला खरा थोडा त्रास मला त्याच्यामुळें. '

"हें ऐकून ती तावातावानें म्हणाली, 'वाटलंच होतं मला ! देणारच तो तुम्हाला त्रास ! अहो, जो माणूस तुम्हाला माझ्यापासून दूर घेऊन जातो, तो तुमचा खरा खरा हितकर्ता, मित्र असणंच शक्य नाहीं ! ह्या जन्मांत तुम्ही ज्यांना ज्यांना म्हणून अनाचार-अत्याचारासाठीं साधनसामुग्री गोळा करून द्याल, तेच सारे शेवटीं तुम्हांला दुःख देणारे ठरणार आहेत. त्यांच्याच हातून तुमचं शेवटीं अनिष्ट होणार, हें पक्कं समजून ठेवा. तुम्हाला वाटत असेल, ते तुमचे स्नेही आहेत असं. पण तेच आहेत तुमचे खरे खरे दुष्मन दावेदार ! पापाला मासणानं जोपासून ठेवलं वा, कीं शेवटीं एके

दिवशीं तेंच पाप माणसावर उलटतं अन् त्याचा सूड उगवतं ! तुम्ही निघून गेलांत, पण इकडे माझी काय अवस्था झाली तें ठाऊक आहे तुम्हाला, सोमेश्वर !'

"मी चकित होऊन तिच्याकडे टकमकां पाहत होतों. तिचा प्रश्न ऐकून मी तिला विचारलं, 'काय झालं होतं तुला मृणाल?'

"ती म्हणाली, 'आतां काय सांगूं तुम्हांला? अन् सांगितलं तरी तुम्हांला तें कळेल तरी कीं नाहीं कोण जाणे? तुम्ही- तुम्ही निघून गेलांत अन् मग माझ्या मनांत निराळेच विचार गोंधळ घालायला लागले ! तुम्ही माझ्यापासून लांब गेलांत ना, कीं मग मला तुम्ही लहान अगदीं एकाद्या बाहुलीसारखे छोटेसे होऊन गेल्यासारखें वाटूं लागतं. इतके लहान, जसं कांहीं कांहीं लहानसं मूल, अगदीं माझं तान्हं बाळ, जसं कांहीं ! वाटायला लागतं, जावं, तुम्हाला उचलून पदराआड पोटाशीं घ्यावं, अन् रस्त्याच्या गर्दीतून तुम्हाला सुरक्षित-पणें पलीकडे पोंचवून यावं ! कुठल्याहि विपत्तीची झळ तुमच्या अंगाला कधीं स्पर्श न करो !'

"मी पाहिलं, मृणालची मुद्रा अगदीं बदलून गेली होती. एक प्रकारच्या अस्वाभाविक आवेगानें तिचं सारं शरीर ठणकत होतं, जसं कांहीं, ती नखशिखान्त थरथर कांपत होती. मी अगदीं खरं सांगतों तुम्हाला, मातृमूर्तीचं असं ज्योतिर्मय रूप मी आणखी कधीं पाहिलं नाहीं !"

"हं!" मी म्हटलं, "माणसाला भुतानं झपाटलं म्हणजे त्याची अशी अवस्था होते, असं सांगतात खरं !"

पण सोमेश्वरांना माझ्या बोलण्याचा राग आला नाहीं. ते थट्टे-वारी नेऊन ते नुसते हंसले अन् म्हणाले, "दुसऱ्या एका दिवसाची हकीकत तुम्हाला सांगतों मी. माझं आयुष्य तऱ्हेतऱ्हेच्या विलासांत अन् व्यसनांत गुरफटलेलं होतं, हें जरी खरं, तरी माझ्या आत कुठें तरी एक प्रकारचं दुःसह दारिद्र्य घर करून बसलेलं होतं, हेंहि

कांहीं खोटं नाहीं. त्या दिवशीं कुठेंतरी कशावरून तें आज आठवत नाहीं; पण माझा भयंकर अपमान झाला होता, अन् त्या वेदना अगदीं असह्य झालेल्या होत्या. आंत नुसती आग पेटल्यासारखी झाली होती माझ्या! कुठं जाऊं मी ही आग शांत करायला? म्हणून गेलों मी मृणालकडे. माझे डोळे डबडबून आले होते! माझा तो अवतार पाहिला, अन् त्या दिवशीं, फक्त एका त्याच दिवशीं, ती आपल्या आसपासचीं माणसं, परिस्थिति वगैरे सर्व गोष्टी विसरल्यासारखी झाली. घरातलीं वडीलधारीं माणसं, रीत-भात, सारं कांहीं ती अजीबात विसरली. सान्यांच्या देखत ती आली अन् माझा हात हातांत घेऊन विचारायला लागली, 'काय झालं सोमेश्वर?' त्यानंतर ती मला एका निराळ्या खोलींत घेऊन गेली. तिथें माझ्या जवळ येऊन बसली, अन् पदरानें माझे डोळे, कपाळ पुशीत म्हणाली, 'कांहीं तरी विशेष घडलं आहे खास! काय झालं, सांगणार नाहीं का मला?'

"मी उत्तर दिलं, 'नाहीं मृणाल. तें मी सांगूसुद्धां शकणार नाहीं.'

"ती म्हणाली, 'सांगूंसुद्धां शकणार नाहीं म्हणतां, तर मग तुमच्या मनावर फारच मोठा आघात झाला असला पाहिजे कशाचा तरी! फार तुम्ही हडहड करून घेतां आपल्या जीवाची! आज आतां तुम्हांला जाऊं देणार नाहीं मी इथून. इथें ह्या अंथरुणावर स्वस्थ पडून रहा असे; आज इथेंच विश्रांति घ्या तुम्ही.' मी पाहिलं, बोलतांना तिचा स्वर थरथरत होता. तिचं मन, तिचा जीव आतल्या आंत रडकुंडीला येऊन थरथरा कांपत होता जसा कांहीं. ह्यालाच म्हणायचं प्रेम! खरं प्रेम हें माणसाच्या अंतर्यामांतून उत्पन्न होतं, अन् तें मानवाच्या पलीकडच्या वस्तूसाठीं, देवत्वासाठीं धडपडायला लागतं. दुर्लभाची आवड, त्यासाठीं धडपड ह्यालाच तर म्हणायचं प्रेम! माझं दुःख पाहून त्या दिवशीं ती अगदीं वेड्यासारखी झाली होती. मध्येंच रागवायची काय, बोलायची काय, अन् डोळ्यावाटे आसवें तर चाललेलींच होतीं सारखीं

इकडं मला एकदां म्हणाली, आज तुम्हाला घरीं जाऊं देणार नाहीं. भारी शिणला आहे तुमचा जीव. आज इथेंच विश्रांति घेतली पाहिजे तुम्ही. अन् कांहीं वेळानंतर तीच म्हणाली, नको, नको ! तुम्ही जाच इथून ! कुठें कुठें अन् कुठवर सांभाळीत बसूं तुम्हाला ? असं कोणतं ठिकाण आहे जगाच्या पाठीवर जिथें तुम्हाला ठेवून मी निश्चित मनानें स्वस्थ बसूं शकेन ? कोणत्या वेळीं कोणत्या कारणासाठीं तुमच्या मनाला कुठें काय रुचेल, खुपेल, तें मी कुठें कसं शोधूं शकणार ? तुम्ही सोमेश्वर, माणूस नाहीं, तुम्ही आहांत वादळ, तुफानी वादळ ! तुम्ही आला उलथापालथ करायला, मोडतोड करायला ! जा ! तुम्ही आतां इथून जा !'

" तिच्या डोळ्यांतून आसवांच्या धारा वाहात होत्या.

" तिच्या घरून मी परत यायला निघालों. उठण्यापूर्वी मी तिला म्हणालों. 'म्हटलं, मृणाल, मी तुझ्याशीं लग्न करणार आहें.'

" 'लग्न करणार आहांत ? माझ्याशीं ?' तिनें विचारलें.

" 'हो; तुझ्याशीं ! मृणालशीं !' मीं उत्तर दिलं.

" 'शिः ! सोमेश्वर, असली गोष्ट पुन्हा कधीं तोंडावाटें काढूं नका ! ' तिनें उत्तर दिलें. आतां तिचा स्वर पूर्णपणें स्थिरावल्यासारखा झाला होता. ती पुढें म्हणाली, ' जीं कुरूप माणसं आहेत, तीं जगांतून कमीच झालीं पाहिजेत, त्यांची संख्या आणखी वाढवूं नका. तीं जगांत पापच आहेत एक प्रकारचं !'

" मी म्हटलं, ' हें काय बडबडते आहेस तूं ? '

" ती म्हणाली, ' मी सांगतें तुम्हांला, मी तुमच्याशीं लग्नं करणं शक्य नाहीं. माझ्या पोटीं जन्म घेणाऱ्या माझ्यासारख्या कुरूप पोराचं लालन-पालन करणं माझ्याच्यानं होणार नाहीं ह्या जन्मांत ! मलाही अभिरुची आहे. सुंदर रूप मला फार आवडतं. मी त्याची पूजा करतें, तुम्ही रूपवान आहांत सोमेश्वर. तुमची वंशधारा मलीन बनवून टाकण्याचा मला अधिकार नाहीं !' "

# ८

" बुद्धि अन् ज्ञान ह्या दोहोंच्या संसर्गानें उज्ज्वल बनलेलं जें प्रेम," सोमेश्वर पुढें सांगूं लागले, "त्याच प्रेमाची प्राप्ती मला मृणाल-कडून झालेली होती. तिच्याजवळ तत्वज्ञानाच्या गोष्टी नव्हत्या, मानसशास्त्र किंवा मनोविश्लेषणाचं शास्त्र कशाशीं खातात, तेंहि तिला ठाऊक नव्हतं. पण कोणत्याहि गोष्टीकडे पाहण्यांची तिची पद्धति, विचार करण्याची तिची तऱ्हाच मुळीं तरवारीच्या धारेप्रमाणें तीक्ष्ण, तशीच उज्ज्वल होती. तुमच्या त्या नाटक-कादंबऱ्यांतून प्रेमाचीं जीं चित्रं रेखाटलीं जातात, त्या साऱ्यांचं रूप एका शब्दांत वर्णन करून सांगायचं झालं तर 'आत्मवंचनेचं विश्लेषण' असंच करावं लागेल. पण इथें असल्या गोष्टीला वावच नव्हता मुळीं! मृणालच्या अंतःकरणांत वरच्या थरावर स्त्रीचं रूप होतं, अन् खालच्या थरावर मातेचं! नारी आणि माता, तिच्या ठायीं प्रगट होणारीं हीं दोन्ही रूपें किती सोज्वळ, किती प्रशांत होतीं! अन् मौज अशी कीं, ह्या दोहोंत कधीं विरोधहि मला दिसला नाहीं. दोहोंचं परस्परांशीं सामंजस्य इतकं होतं कीं खरोखरी ती एक अपूर्व गोष्टच समजली पाहिजे. तिला फक्त देणंच ठाऊक होतं. परत-फेडीची किंवा मोबदल्याची अपेक्षा नव्हती. अन् आशा तर नव्हतीच. जें कांहीं तिनें दिलं तें तरी कसं? अगदीं गंगा दुथडी भरून वहात होती जशी कांहीं. आपलं सारं भांडार अगदीं दोन्ही हातांनीं लुटवीत सुटली होती ती. परत मिळावं असं कांहीं तिच्या बाबतींत नव्हतंच. जें कांहीं तिला मी द्यायला जाई तें तिच्या दृष्टीनें अगदींच सामान्य-क्षुद्र ठरायचं!"

" हूं ! –"

" मला वाटतं, प्रीतीचा तोंडवळा हा असाच असतो. तिथं अश्रूंचा विलास नाहीं, समाजांतल्या चार–चौघांच्या आडपडद्यांच्या कटकटी नाहींत, उसासे नाहींत, उमाळे नाहींत, कांहीं नाहीं ! रुसण्या-फुगण्याचा, मान-अभिमानाचा कधीं तिनं अभिनय केला नाहीं, कीं ऊन-सावलीचे खेळ ती खेळली नाहीं. तिच्या सहवासांस, तिच्यामुळें मला माझ्यांतल्या सर्वश्रेष्ठ, सर्वोत्तम मनुष्यत्वाचा अनुभव येऊं शकला. माणसांतलं हिणकस जें, तें नाहींसं करून, त्याच्यांतलं खरं खरं शंभर नंबरी सोनं बाहेर प्रगट होईल असा तिचा प्रभाव होता ! " बोलतां बोलतां सोमेश्वरांनीं पुन्हा डोळे मिटून घेतले.

असाच कितीतरी वेळ निघून गेला. आमच्यापैकीं कोणीच कांहीं बोलत नव्हतं. कांहीं वेळानें, डोळे मिटूनच सोमेश्वरांनीं पुढें सांगायला सुरुवात केली. ते म्हणाले, " त्यानंतर किती वर्षं निघून गेलीं तें आठवत नाहीं आता. मी आपला संसार थाटला होता, बायका-पोरांत मन गुंतलं होतं माझं. डोक्याचे केस गळून टक्कलहि पडायला सुरुवात झाली होती. माझी बायको मृणालला भारी आवडायची. त्या दोघींचं खूपच सूत जमलं होतं. पण, माझं लग्न झालं, अन् त्यानंतर थोड्याच दिवसांनीं मृणाल गांव सोडून निघून गेली. जाण्या-पूर्वीं तिनें माझा भार माझ्या बायकोच्या हातीं सोंपवला, अन् ती निघून गेली. कुठें गेली, त्याचाहि पत्ता मला लागूं दिला नाहीं. जाण्यापूर्वी तिनं मला बजावून सांगितलं व म्हणाली, ' माझा शोध लावण्याची खटपट करूं नका. ' मी देखील तिची ती आज्ञा पूर्णपणें पाळली. "

ह्या वेळीं मीच मधें तोंड घालून विचारलं, " कां बरं ? कां नाहीं तुम्ही तिचा शोध काढला ? "

" कां नाहीं काढला मी तिचा शोध ? " सोमेश्वरांनीं उत्तर दिलं. " सांगूं तुम्हाला ह्या तुमच्या प्रश्नाचं उत्तर ? खरं सांगायचं

म्हणजें तिला शोधण्याची मला कधीं गरजच भासली नाहीं बघा. ती गांव सोडून निघून गेली होती, ह्याचा अर्थ शरीरानें ती तेथें नव्हती, एवढंच. अन् तसा तिच्या शरीराशीं माझा काय संबंध होता ? तिचा शोधच करायचा, तर तो मी माझ्या मतानें, अगदीं जीव-प्राण एक करून करायला पाहिजे ! अन् तसा शोध करीत सुटण्याचं कधीं प्रयोजनहि वाटलं नाहीं मला. तिचं शरीर माझ्या शरीराच्या दृष्टी-पुढून दुसरीकडे निघून गेलं होतं, एवढंच. पण तशी ती माझ्यांतून थोडीच नाहींशी झाली होती ? भगवद्गीतेप्रमाणंच तिची माधुरी अवीट होती. जेव्हां जेव्हां मी तिच्याबद्दल विचार करायला लागा-यचा, तेव्हां तेव्हां मला नवीनच अर्थ आढळायचा ! जिकडे पहावं, जिकडून पहावं, तिकडे नव्यानें डोळे उघडल्यासारखं वाटायचं मला ! ”

“ हं ! पुढें काय झालं ? ”

“ त्यानंतर ? त्यानंतर फक्त एकदाच तिची-माझी पुन्हा गांठ पडली होती. अन् ती देखील किती ? अगदीं पांचच मिनिटांपुरती ! तशी ती भेटलीच नसती, तर त्यामुळे कांहीं बिघडणार होतं असं नाहीं. कमलेश्वर तीर्थाच्या वाटेवर चंपारण्यांत एका स्टेशनवर मला मृणाल अगदीं अभावितपणें भेटली. संन्याशाच्या वेशांत ती भीक मागत, राधा-कृष्णाचीं गाणीं गात मजेंत हिंडत होती. तिचं यौवन नाहींसं झालेलं होतं. अंगावर फाटकीं-तुटकीं मलीन वस्त्रं. तिची मूळची कुरूपता अधिकच कुरुप बनून पुढें आली होती जशी कांहीं ! मी एका मोठ्या जमीनदाराचा श्रीमंत मुलगा. स्वतः आतां धनाढ्य जमीनदार झालेला ! हे ‘ राजेसाहेब ’ त्या भिकारणीच्या पुढें जाऊन उभे राहिले ! त्या वेळीं, जावं अन् तिच्या पायावर आपलं डोकं टेकावं अशी फार प्रबळ इच्छा माझ्या मनांत उत्पन्न झाली. फारसं बोलत बसायला वेळ नव्हता. आम्हा उभयतांच्या मधें एक फार मोठी दरी ‘ आ ’ वासून उभी झाली असल्यासारखं मला त्य

वेळीं वाटलं. अगदीं काळाचा अंत होईपर्यंत जरी मी तिला पकडायला धांवत सुटलों तरी ती माझ्या हातीं गवसणं शक्य नाहीं, एवढं मोठं हें आमच्या मधलं अंतर आहे, असंच मला वाटूं लागलं. तुम्हाला आश्चर्य वाटेल ऐकून, पण खरं सांगतों. अशा रीतीनें इतक्या अवकाशानंतर आमची भेट झालेली. पण तिनें एका शब्दानेंहि माझ्याबद्दल चौकशी केली नाहीं ! ना माझ्या तब्बेतीची, ना आणखी कशाची! माझ्या संबंधांत आतां तिच्या मनांत तो पूर्वीचा उद्वेग, ती उत्कंठा जशी कांहीं उरलीच नव्हती अजीबात. इतकंच काय, पण तिनें धडपणें माझ्याकडे पाहिलं देखील नाहीं ! माझ्या जवळून केव्हां एकदां दुसरीकडे निघून जाते, अशीच उत्कंठा जशी कांहीं तिला लागून राहिलेली होती ! त्यांतच तिला खरा आनंद होणार होता जसा कांहीं ! ती निघून जाण्यासाठीं धडपड करते आहे असं पाहून तिच्या वाटेंत आडवा येत मी तिला प्रश्न विचारला, ' आपला असा सत्यनाश काय म्हणून करून घेतलास तूं मृणाल ?' "

" आवेगानें उसळणारा थरथर कांपणारा माझा स्वर, माझा तो प्रश्न कानीं पडून तिच्या तोंडावर हंसूं उमटलं. तपोवनातल्या ऋषिकन्येच्या सारखं ज्योतिष्मान होतं तिचं तें हंसणं. अत्यंत सौभाग्याच्या परिपूर्तीनें भरलेल्या स्वरांत,माझ्या खाद्यांवर हात ठेवून ती म्हणाली, " सत्यानाश !– आपला सत्यानाश !– म्हणजे– आपलेपणाचा, सर्वस्वाचा नाश करून माझं सर्वस्व मी मिळवलं आहे, सोमेश्वर ! '

" मी दचकलोंच हें ऐकून. म्हणालों–'काय म्हणतेस ? म्हणजे –म्हणजे तुझं आतां माझ्यावर प्रेम नाहीं उरलं ?– '

" ती म्हणाली, ' नाहीं ! '

" मी विचारलं, ' काय?– नाहीं ? '

" ती पुन्हा तशाच शांत स्वरांत म्हणाली, ' अंहं ! ज्याच्यावर माझं प्रेम आहे, तो आहे माझ्या मनांत. ' त्यानंतर आपल्या हृदयावर हात ठेवून ती आणखी म्हणाली, 'ह्या इथं आहे त्याचं वृंदावन. इथंच

आहे त्याचा वास. मी कधींच कोणावर प्रेम केलं नाहीं दुसऱ्यावर, सोमेश्वर ! '

" मी कांहींसा चिडल्यासारखाच झालों होतों. विचारलं, 'अस्सं ! म्हणजे, इतके दिवस माझी फसवणूक चालविली होतीस तूं ?'

" ती एकदम लगबगीनें म्हणाली, ' छे, छे ! तसं समजूं नका तुम्ही ! तुमच्यामुळेंच तर मी माझ्या हृदयाच्या ठेव्याला भेटूं शकलें ! आमची भेट घडवून आणणारे तुम्हीच होता दूत ! '—त्यानंतर ती हंसली, एकदम खालीं वाकली, अन् माझ्या पायावर डोकं ठेवून, माझ्या पायाच्या धुळीचा टिळा आपल्या कपाळावर लावीत म्हणाली, ' महाराज, गरीबाला कांहीं भिक्षा द्याल ? '

" मी तिच्या पसरलेल्या झोळींत कांहींच टाकलं नाहीं, टाकूं शकलों नाहीं. तिच्यासारखीला देतां येण्याजोगं माझ्याजवळ काय होतं ? तें सामर्थ्यहि माझ्यांत नव्हतं, अन् तेवढी शक्तिहि नव्हती ! मी नुसता आश्चर्यानें स्तंभित झालेल्या दृष्टीनें पाहत होतों,—पाहिलं मृणाल हळूहळू दुसरीकडे निघून गेली ! हंसत—हंसत, हलत—डोलत राधाकृष्णाचं भजन गुणगुणत, अगदीं मजेंत निघून गेली मृणाल माझ्या पुढून ! आपलं आत्यंतिक सख्य अन् सौहार्द्र समर्पित करून जणूं काय तिनें आपल्या परम प्रेमिकाची प्राप्ति करून घेतली होती ! आपल्या मस्तींतच ती मस्त होती !"



# ३

गोष्ट संपली, तसा माझा जीव भांड्यांत पडल्यासारखा होऊन मी सुटकेचा एक निःश्वास सोडला. मनांतल्या मनांत मला एक-सारखी धास्ती वाटत होती. घरांतल्या कोण्या माणसांनीं आमचं बोलणं ऐकलं तर नसेल ना ? आमचे डोक्याचे केस पिकले आहेत आतां. आतां ह्या वयांत, गोष्टीच्या रसवस्तूकडे तितकंसं लक्ष नसतं माणसाचं ! ह्या वयांत एकाच बाबतींत आमचे कान टवकारलेले असत– कुठें कांहीं अश्लीलपणा, अश्लीलपणाचा आभास सुद्धां का होईना –व्यक्त तर झाला नाही ना ? केंस :पांढरे झाले आहेत ना ! म्हणूनच आतां–मक्षिका व्रणमिच्छन्ति ?

पण जाऊं द्या तें. ज्याचं भय वाटत होतं, तसं कांहीं गोष्टींत येऊं दिलं नाहीं, ह्याबद्दल सोमेश्वरांचें आभार मानावे तेवढे थोडेच होते. त्यांच्या गोष्टीचा प्रवाह अस्खलित होता भाषा प्रांजळ होती अन् ती सांगण्याची शैली संयमपूर्ण होती. गोष्ट संपवून त्यांनीं तमोर ठेवलेल्या व्हिस्कीचा पेला उचलला अन त्यांतलं उरलं होतं तें पेय एका दमांत पोटांत ढकलून, पेला परत जागेवर ठेऊन ते पुन्हा डोळे मिटून ध्यान लावून बसले ! आतां उठून आजच्या पुरता त्यांचा निरोप घेऊन घरचा रस्ता सुधारला म्हणजे मिळवली ! तुम्हीच सांगा, आमच्यासारखे दोघे म्हातारे, समोर व्हिस्कीचा पेला ठेऊन आपल्या तरुणपणाच्या एका प्रेमाच्या भानगडीचा पसारा मांडून बसले आहेत, ह्यापेक्षां अधिक विसंगत, अ-शोभन दुसरं काहीं असूं शकतं का ? आमची यात्रा आतां संपायला आलेली. जीवनाच्या

सायान्हकाळच्या तीरावर आम्ही येऊन ठेपलेले. आम्हाला पैल-तीरावर नेऊन पोंचविणारी नाव केव्हां येते अन् आम्हाला घेऊन जाते ह्याची आतां आम्ही वाट पाहात बसलेले. अज्ञानाच्या दाट धुक्यांत दडलेल्या पैलतीराची हांक आमच्या कानावर आदळत असलेली ! आतां ह्या वयांत आम्ही माना वळवून मागें पहात सुटायचं ? निर्बोध तरुण मंडळीचं आम्ही अनुकरण करीत सुटायचं ? आम्हीच ज्या जीवनाचा परित्याग केलेला, उपेक्षित म्हणून सोडून दिलेले, त्याच आमच्या पूर्वकाळच्या जीवनाची ओळख झाल्यामुळें ज्यांच्या दंभाला आज सीमा नाहीं अशा तरुण मंडळींचं अनुकरण आम्हीच करूं लागायचं ? हें शोभतं का आम्हाला ?

सोमेश्वरांचा निरोप घेतला, अन् मी उठलों. घरीं यायला रात्र झाली होती. आतां कांहीं तरुण राहिलों नाहीं. म्हातारा झालों आहें. केस पिकले आहेत माझे. म्हणून, घरीं परत यायला अपरात्र जरी झाली तरी माझा कोणाला भलता-सलता संशय येणार नाहीं; माझ्या बायकोला तर येणार नाहींच ! कारण, माझ्या बायकोचंहि वय माझ्याप्रमाणंच उतरणीला लागलं आहे अन् ह्या उतरत्या वयांत तिची ठाम समजूत झालेली आहे, तिच्यासारखी स्त्री काळजी घ्यायला नसती, तर माझे हाल कुत्रा खाता ना ! कुत्र्या-मांजरांप्रमाणंच मी रस्तोरस्तीं अन् दारोदारीं हिंडत बसलों असतों ! जाऊं द्या. तिची समजूत तिच्यापाशीं. काय करायचं आहे आपल्याला त्या गोष्टीशीं ? एक मात्र अगदीं खरं. पुरुष वयानें कितीहि वाढो, त्याच्यावर केव्हांहि विश्वास टाकणं उचित नाहीं ! अन् त्याचप्रमाणें, बायको म्हटली कीं तिला देखील, कोणत्याहि वयात अन् कोणत्याहि अवस्थेंत एकटी सोडण्याची सोय नाहीं ! आतां, हेंच पहा ना ! माझ्यासारख्या ह्या उतार वयांतील माणूस इतका वेळपर्यंत, तास अन् तास, केवळ तरुण वयालाच शोभण्यासारखी चर्चा करीत बसला होताच ना ? पण कोणाला पुसट तरी संशय येईल का, असं कांहीं

असेल अशी ? लोक तर हेंच समजतात, वय झालं आहे याचं. रोज बिचारा गीतेचा पाठ करीत असतो जोरजोरानं ! असल्या माणसाच्या चारित्र्याबद्दल संशय येईल तरी कोणाला ? ती गोष्ट तरी काढायला कोणी तयार होईल का ?

मी आपला साळसूदपणें घरीं आलों अन् सरळ आपल्या खोलींत गेलों. हें घर, हा संसार, हें कुटुंब, सारं कांहीं मी निर्माण केलेलं होतं. मीच ह्या सर्वांचा जनक, मीच ह्यांचा प्रतिपाळ करणारा ! ह्या नाटकांतला मीच नायक होतों ! माझी बायको आहे, पण ती नख-दंत-हीन, विगतयौवना ! एक दिवस होता, जेव्हां तिच्याहि अंग-प्रत्यंगांतून नवा उत्साह, नित्य नवा उत्सव ओसंडत असे. पण ते दिवस गेले. आतां तें सारं धुवूनं पुसून लख्ख होऊन गेलं आहे अगदीं. बरं झालं, आतां भिण्याचं कारण उरलं नाहीं ! एक मला सोडलं, तर आतां तिच्याकडे दृष्टि उचलून पाहणारा माणूस ह्या उभ्या जगांत दुसरा एक तरी आढळेल का कोणी ? कसा सांपडणार ? स्त्रीचा जो कोणता आदर, मान-पान, सत्कार व्हायचा, जी कांहीं तिची ख्याति म्हणा, कुख्याति म्हणा व्हायची, ती सारी, केवळ ती जोंपर्यंत तरुण असते तोंपर्यंतच. तिचं यौवन ढळलं म्हणजे मग ती होऊन राहते नुसती अडगळ, जळून गेलेली दिव्याची वात ! तिचं प्रयोजनच संपून गेल्यासारखं होऊन जातं. अशी स्त्री म्हणजे नुसती वायफळ वस्तु, ओवाळून टाकून दिलेली दहीभाताची मूद, निर्माल्य ! वृद्ध स्त्रीला पुरुषांच्या समाजांत स्थान नाहीं, अन् वृद्ध पुरुषाला रसिकांच्या समाजांत स्थान नाहीं !

" आमच्या सारख्यांच्या नजरेंत ही विशाल पृथ्वी, हा वैचित्र्यपूर्ण संसार, आतां संकुचित, लहानसा बनून गेला आहे---" त्या दिवशीं सोमेश्वर म्हणाले होते. " हा आमच्या वयाचा परिणाम ! आतां, ह्या वयांत, चारी बाजूला बांसरीचे स्वर उमटत असलेले

कळत नाहींत. आतां तर फक्त एकाच करुण संगीताचे स्वर, एकाच दिशेनें येत असलेले काय ते ऐकूं येतात. अन् त्या संगीतांत एकच सूर उमटत असतो,–तो म्हणजे, आतां ह्या सर्व गोष्टींचा अखेरचा निरोप घेऊन येथून चालतं व्हायचं, हाच ! ––"

त्यांचं हें बोलणं ऐकलं, अन् मनाला वाटायला लागलं, पुन्हा आली ह्या गृहस्थाला आज लहर ! आतां पुन्हा हा त्या दिवसासारख्या गोष्टी बोलायला सुरुवात करणार वाटतं !--मन थोडंसं चरकलंच माझं. बैठक रंगायची अन् अशा विषयांच्या उहापोहांत ? घाईघाईनें त्यांना अडथळा करण्याच्या हेतूनें मी म्हणालों, " सोमेश्वर, म्हातारपणीं आतां स्त्री--पुरुषांच्या आसक्तीच्या गोष्टी ऐकत बसणं बरं वाटत नाहीं बुवा, कांहीं म्हणा तुम्ही ! तुमच्या त्या तसल्या गोष्टी, मनाच्या अन् भावनांच्या आवेगाच्या पॉलिश करून कितीहि झकपक करून तुम्ही समोर ठेवल्यात, तरी तिकडे पहायला मन घेत नाहीं आतां ! "

" बरोबर बोललांत तुम्ही ! " सोमेश्वरांनीं त्यावर उत्तर दिलं " तुमच्या त्या लोकप्रिय, प्रथितयश कादंबरीकाराचं लिखाण वाचून माझ्या मनांतहि असलाच विचार आला होता पहा. वाङ्मयाचं दुकान थाटून धंदा करायला निघालेल्या ह्या लेखक महाशयांच्या प्रारंभींच्या गोष्टी--कादंबऱ्यांतून अल्पवयस्क तरुण मुलं--मुली, नायक अन् नायिका म्हणून असायच्या ! पुन्हा पुन्हा बी. ए. च्या परीक्षेंत नापास होणारे आमचे तरुण, अन् कारकून नवरा दप्तरांत गेल्यानंतर, घरांत बसून दुपारचा वेळ घालवायला दुसरा उद्योग नसणाऱ्या अर्धवट बाया, असल्या मंडळींना ह्या गोष्टी कादंबऱ्या खूप आवडायच्या ! मारे मिटक्या मारीत त्यांचीं पारायणं करण्यांत दंग होऊन जातात बिचारे ! ज्यांना कशाचंच कांहीं नाहीं अशा इतो भ्रष्टस्ततो भ्रष्ट: स्त्री--पुरुष पात्रांच्या तोंडीं वाटेल तशी भरमसाट, असंबद्ध मानसशास्त्राची बडबड घातलेली पाहिली कीं त्या

असल्या वाचकांनीं म्हणायचं,-- अहाहा ! काय ही ह्या लेखकाची दांडगी प्रतिभा ! अन् त्यांना तरी बिचाऱ्यांना कां वाटू नये तसं ? पोरीसोरींच्या पदरांच्या वाऱ्यावर फडफडत उडत राहणं हेंच त्यांच्या नायकांचं पौरुष ! नायकावर आपल्या स्वतःच्या चारित्र्याचा ठसा उमटलेला पहावा अशीच त्या वाचकांची साहजिकच इच्छा असते ! ----"

खरं सांगतों, सोमेश्वरांचं हें असलं बोलणं कांहीं मला रुचलं नाहीं. पण ते पडले श्रीमंत ! त्यांच्याविरुद्ध माझ्यासारख्या यःकश्चित् माणसानं कांहीं बोलायचं म्हटलं, तर तें तरी कसं जुळावं ? पण, कोणी कितीहि श्रीमंत असला, म्हणून काय झालं ? माणसाचीं स्वतःचीं कांहीं मतं असतातच कीं नाहीं ? नुसत्या श्रीमंतीच्या जोरावर कोणी वाटेल तसं बोलायला लागला तर तें कुठपर्यंत ऐकून घ्यायचं माणसानं ? मी शेवटीं म्हणालोंच, "----हें पहा सोमेश्वर, जे वयानं आपल्यापेक्षां मोठें आहेत, सर्वसाधारण लोकांच्या मनांत ज्यांच्याबद्दल सन्मान आहे, आदर आहे, श्रद्धा आहे, अशा माणसाची टवाळी करणं बरं नाहीं बुवा ! -- तुमचं हें सारं बोलणं कोणा लेखकाला उद्देशून आहे, तें तरी कळूं द्या. कोणावर चढवतां आहांत तुम्ही हा हल्ला ? काय नांव आहे त्या लेखकाचं ? "

सोमेश्वर म्हणाले, " तेवढं सांगायला सांगूं नका मला. "

मी म्हणालों, " कां बरं ? जर तुमचा असा आरोपच असेल एकाद्या माणसावर, तर त्याचं नांव तेवढं सांगायला तुमची हरकत काय म्हणून असावी ? "

सोमेश्वर म्हणाले, " त्याचं असं आहे पहा, कोणाहि एका व्यक्तीचं नांव घेऊन बोलायचं ठरवलं ना, कीं मग त्याबरोबर माणसाच्या जिभेवर आपोआप थोडा बहुत लगाम येऊन बसतोच. सारीच गोष्ट मग निव्वळ वैयक्तिक स्वरूपाची होऊन बसते. इथें मी

जें कांहीं बोलतों आहें तें कांहीं विशिष्ट लेखकांच्या प्रवृत्तीसंबंधीं आहे. पुढें ऐका. जसजसं ह्या लेखक महाशयांचं वय वाढत चाललं, तसतशा त्यांच्या कथानकांतील नायक-नायिकाहि पुढारलेल्या वयाच्या दिसून येऊं लागल्या. तुमच्या त्याच एका लोकप्रिय, प्रथित-यश कादंबरीकाराच्या एका नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या गोष्टींत मी वाचलं, त्यांच्या नायिकेचं वय जवळ जवळ चाळीसच्या आसपास होतं. चांगली चार पोरांची आई होती ती. आणखी नायकाचंहि वय पन्नाशीच्या पलीकडे गेलेलं होतं. ही त्यांची कादंबरी एका मासिकां-तून प्रसिद्ध होत होती. ह्या म्हातारा-म्हातारीचा डरसाल निर्लज्ज-पणा पाहाण्यासारखा होता. हा त्यांचा प्रॉब्लेम ! हा प्रॉब्लेम घेऊन तुमचे ते साहित्यिक मारे मोठ्या दिमाखानें लेखणी चालवीत होते ! " बोलतां बोलतां तिरस्कारानें नाक उडवीत सोमेश्वर पुढें म्हणाले, " आपल्या स्वतःच्याच इच्छावृत्तीला साकार मूर्त रूप देऊन जो लेखक आपल्या गोष्टी-कादंबऱ्यांच्या नायक-नायिकांचं स्वातंत्र्य नष्ट करून टाकतो, त्याला ' लोकप्रिय, ' ' प्रथितयश ' म्हणून वाटेल तितकं नाव मिळवूं द्या. लोक त्याला अगदीं डोक्यावर घेऊन नाचले, तरी माझी हरकत नाहीं त्या गोष्टीला! हें असं कसं होतं, कां होतं, तेंहि मी समजूं शकतों. सर्वसाधारण वाचकांच्या,अन् असल्या लेखकांनी निर्माण केलेल्या जाहिरातबाजीला अन् गटबाजीला असलीं फळं न आलीं तरच नवल ! पण दुर्दैवानं हें असं होत असलं, म्हणून असल्या लेखकांच्या ह्या करणीला प्रतिभा हें नांव मात्र मेहेरबानी करून देऊं नका, एवढंच माझं म्हणणं. अहो, मातीच्या दिवलाणींतला मिणमिण प्रकाश म्हणजे सूर्याचे किरण नव्हे ! "

मी म्हणालों, " जाऊं द्या, सोमेश्वर. पुरं झालं हें आतां. साहि-त्याच्या अन् वाङ्मयाच्या टीकेच्या नांवाखालीं एकाद्या माणसाबद्दल व्यक्तिशः तिरस्काराचा प्रचार कशाला हवा ? तुम्ही आतां वयानें तरुण नाहीं. उगाच कशाला कोणा बिचाऱ्या दरिद्री साहित्यिकाच्या

तोंडचा घास काढून घेण्याचं पाप करतां ह्या वयांत ? ते आपलं काम करताहेत, लिहिणारे लिहिताहेत, वाचणारे वाचताहेत, ज्याला जसं वाटेल त्याप्रमाणं बरं-वाईट म्हणताहेत. आपल्याला कशाला ह्या त्यांच्या पंचायती ? "

व्हिस्कीचा पेला समोर आला. त्याच्याकडे एकदां पाहून सोमेश्वरांनीं डोळे मिटून घेतले अन् ते बोलूं लागले. म्हणाले, "खरं आहे तुमचं म्हणणं. आजकाल हें माझं असंच होतं बघा. एकाद्या विषयावर मी बोलायला लागलों, कीं माझ्या मनाचा क्षुद्रपणा आपोआप बाहेर डोकवायला लागतों बघा. हें असं कां होतं, तेंहि मला कळतं. माझं आतां वय झालं. म्हातारपण आलं. गात्रं शिथिल झालीं आहेत सारीं. पण ह्या सर्वांच्या खालीं,–खरं सांगूं वृद्धापकाळच्या ह्या अकर्मण्यतेच्या अन् अयोग्यतेच्या दडपणाखालीं माझी पाशवी देहलालसा अजूनहि जागीच आहे. ती मात्र थंड पडलेली नाहीं. हेंच आहे ह्याचं मूळ कारण ! "

हे शब्द ऐकले, अन् मी दचकलों ! मनांत म्हटलं, कोणी ऐकलं तर नसेल ना ? हें काय बडबडायला लागला आहे म्हातारा आतां? देहलालसा! राम ! राम ! खरोखरीच ह्या सोमेश्वराची संगत म्हणजे माझंच मरण जवळ ओढवल्यासारखं व्हायला लागलं आहे आजकाल ! कोणी ऐकलं तर माझ्याबद्दल काय समजूत करून घेतील लोक? ह्याचं हें असलं बोलणं. ह्यांना वाटत असेल अगदीं स्पष्ट शब्दांत कसलाहि आडपडदा न ठेवतां जें खरं असेल तें सरळ स्पष्ट शब्दांत सांगून टाकण्यांत आपण मोठी बहादुरी गाजविली म्हणून ! पण म्हातारपणीं इफेक्ट मारण्याच्या प्रयत्नांत ग्राम्य स्पष्टोक्तीचा अवलंब करणंसुद्धां, आपली ऐट मिरवायला निघालेल्या शाळकरू पोराच्या धडपडीसारखीच अश्लाघ्य नाहीं तर काय? पण काय करायचं ? सोमेश्वर पडले एका मोठ्या जमीनदाराचे चिरंजीव ! त्यांच्या नावाला 'राजा'ची उपाधि चिकटलेली ! त्यांच्या तोंडावर

त्यांना विरोध तरी कसा करायचा ? केवळ निरुपाय म्हणूनच मी त्यांच्या तोंडाकडे टकमका पाहत बसून राहिलों. मनाला सारखी काळजी लागलेली होती, हा गृहस्थ आणखी कांहीं भलतसलतं कुठं कांहीं बोलून न बसो ! त्यापेक्षां तर मघाशीं त्या लोकप्रिय लेखकाची तोंडभर निंदा चालविली होती ती पुरवली !

सोमेश्वर पुढें बोलूं लागले, "म्हणूनच माझ्या जीवनांत अतृप्ति आलेली आहे, अवसाद आलेला आहे ! – मी एकटाच असलों, कीं माझ्या डोळ्यापुढें हळू हळू एक धूसर छाया येऊन उभी ठाकते. ह्या धूसरतेला नाहीं चैतन्य, नाहीं तिला रंग, नाहीं रूप, नाहीं गंध पूर्णपणें अवसन्न, खिन्न, परिश्रांत अशी असते ती अवस्था, ती छाया ! माझ्या पूर्वीच्या आयुष्यांत जेव्हां जेव्हां मी माझ्या वासना-तृप्तीपासून वंचित राहिलों अशा प्रसंगीं कधीं कधीं मला ज्या धूसर छायेचं दर्शन होत असे तीच ही छाया आजही माझ्यासमोर येऊन उभी होते ! "

पेला हातांत घेऊन त्यांतले एक-दोन घोंट पोटात टाकून सोमेश्वर पुढं म्हणाले, "अतृप्त वासनेचं हें छायारूप मोठं भयानक असतं. कधीं मी तें रूप कोणा एका सायंकाळीं कुठल्या तरी एका नदीच्या काठीं पाहिलं होतं, कधीं समुद्राच्या तीरावर आणि कधीं खिडकीच्या बाहेर पसरलेल्या अनंत, आकाशाच्या निळ्या विस्ताराकडें पाहत असतांना आत्मविस्तृत विचारचिंतनांतहि मीं तें पाहिलं ! अन् त्या वेळीं तें पाहून, घाबरून जाऊन त्या छायेला टाळण्यासाठीं, अविरतपणें धांवत सुटणाऱ्या संसाराच्या जिवंत वाहत्या प्रवाहांत मी स्वतःला बुडवून टाकलं. ह्या व्यापांतून निराळा, एकटेपणाचा एक क्षण सुद्धां मला नकोसा वाटत असे. कारण माझं मन असं एकटं असलं कीं ही अतृप्तीची छाया समोर उभी राहिलीच ! अन् ती ह्या माझ्या म्हातारपणींसुद्धां कशी माझ्या मागें मागें येते आहे पहा ! भुता–

प्रमाणें हें सचेतन मन माझा पाठलाग करीत आहे,-बाळपणापासून तारुण्यावस्थेंपर्यंत, अन् तारुण्यानंतर आतां ह्या वृद्धापकाळापर्यंत तें एकसारखं माझ्या पाठोपाठ येत आहे. कांहीं केल्या पिच्छा सोडीत नाहीं माझा ! माझे डोळे, जीवनांत जें चैतन्यपूर्ण असेल, जिवंत असेल, प्राणवान् असेल, तें न्याहाळण्यांत नेहमींच गुंतलेले असत. आत्म्याची तहान लागून तें नेहमींच व्याकुळलेलें असतं. सारं कांहीं मी पहात असें, ऐकत असें, पुष्कळसं त्यांतलं मला कळत नसेहि. पण, माणसाला दुःख होतं तें कशामुळें, कोणत्या बाबतींत तो अकारणच निष्ठुर बनून वागायला लागतो, दुर्बलावर कुठें पुनः पुनः आघात होत असतो, तें मात्र मी अगदीं लहानपणापासूनच पाहत आलों आहें! "

मी मध्येंच म्हणालों, "हंऽ ! पण दैवानं ज्यांना सामर्थ्य दिलं आहे, ज्यांच्याजवळ पैसा आहे, शक्ति आहे, असे लोक ह्या गोष्टीला पायबंद घालूं शकतात कीं नाहीं ?"

"नाहीं !" सोमेश्वरांनीं उत्तर दिलें. "दुर्बलावर होणाऱ्या आघाताचा एक दिवस प्रतिकार करणारेच दुसऱ्या दिवशीं त्याच दुर्बलांचा स्वतःच छळवाद करायला पुढें सरसावतात, हेंच मीं पाहिलं आहे. शक्तिसंपन्न समर्थांच्या हातून सतत मारच खात राहणाऱ्यांचा एक वर्ग संसारांत नेहमीं असतोच. इतिहासांतहि ही एकच एवढी गोष्ट सांगितलेली आहे जगाच्या ! जीवनाचं हें रूप, मी आठ-दहा वर्षांचा होतों तेव्हांपासूनच पाहत आलों आहें."

मी म्हणालों, "आत्ता आलं लक्षांत. आजच्या तुमच्या गोष्टीची भूमिका आतां आली ध्यानांत माझ्या !"

अशांतच, रोजच्याप्रमाणें नोकर हुक्का घेऊन आला. चांदीची चिलीम, तींत उंची गुडाखू. अंबरी तंबाखूचा घमघमाट दिवाण-खान्यांत दरवळायला लागला. हुक्क्याची नळी माझ्या हातांत देऊन नोकर निघून गेला. मी गुडगुड आवाज काढीत हुक्का ओढूं लागलों.

सोमेश्वर व्हिस्कीचा घोट घेऊन डोळे मिटून बसून राहिले. तशा स्थितींत, डोळे मिटूनच कांहीं वेळानें ते बोलूं लागले. ते म्हणाले, "आमच्या त्या जुन्या गिढीजात वाड्याच्या गोष्टी मी बोललों आहें तुमच्याजवळ कित्येकदां. आठवत असेल तुम्हांला. खूप मोठा वाडा होता तो. मागें पुढें चांगला मोठा थोरला बगीचाहि होता. एके काळीं आमच्या कुटुंब-परिवारांत पुष्कळशीं माणसं होतीं. त्या सर्वांसाठीं एवढा मोठा वाडा आवश्यक होता. खूप मंडळी होती घरांत त्या काळांत. आज त्यांच्यांतले कोण कुठें गेले, त्याचा पत्ता सुद्धां नाहीं."

मी म्हणालों, "गोष्ट सांगायला सुरुवात केल्यानंतर, मध्येंच असं तत्त्वज्ञान घुसडणं शोभून दिसत नाहीं बुवा."

सोमेश्वर म्हणाले, "खरं आहे. मुद्दाम ओढून ताणून तत्वज्ञान आणण्याचा जर कोणी प्रयत्न केला, तर तुम्ही म्हणतां तें कबूल आहे मला. पण अगदीं सहजगत्या, ओघाओघानेंच जर तें एकाद्या जागीं आपण होऊन येऊन बसलं, तर ?"

मी म्हणालों, "तसं असतं तर चालेल एकादे वेळेला. पण तरी-सुद्धां त्यांना अवास्तव महत्त्व मिळालेलं चालायचं नाहीं गोष्टींत. इतर सर्व गोष्टींबरोबर सारख्या वजनाचंच जर असलं तुमचं तत्त्व-ज्ञान, तर गोष्टींत खपून जाईल तें एक वेळेला. पण जर त्यावरच अवास्तव भर दिला गेला, तर मात्र त्यांच्या वजनाखालीं रसनिष्प-त्तीची नाव एका बाजूला कलती होऊन रसातळाला जायची एकाद्या वेळेला!"

"हंऽऽऽ!" एक लहानसा सुस्कारा सोडून सोमेश्वर म्हणाले. "डोक्याचे केस पिकले, म्हणजे माणूस चळतोच थोडासा, नाहीं म्हटलं तरी. कोणची गोष्ट कधीं, कुठें, किती प्रमाणांत वापरावी तें म्हातारपणीं माणसाला कळेनासंच होतं, हें काहीं खोटं नाहीं. बरं. जाऊं द्या तें. मी तुम्हाला सांगत होतों आमच्या त्या जुन्या राहत्या

वाड्याची गोष्ट. पुष्कळ वर्षं होऊन गेलीं आहेत आतां त्या गोष्टीला. बारीक सारीक गोष्टींची स्मृति आतां पुष्कळशी अस्पष्ट, पुसट झाल्यासारखी झालेली आहे. मनांत त्या साऱ्या एकमेकींत मिसळून जाऊन एक कडबोळ्यासारखं तयार झालं आहे कांहीं तरी. पण जसं कांहीं जमेल तसं सांगतोंच तुम्हाला. एक दिवस काय झालं, आमच्या त्या जुन्या वाड्यांत एक गृहस्थ रहायला आले. तळमजल्यावरची एक बाजूची, रस्त्यालगतची खोली त्यांनीं आपल्यासाठीं भाड्यानें घेतली. वाड्यांतल्या त्या बाजूच्या खोल्या भाड्यानें देण्यासाठींच निराळ्या काढून ठेवल्या होत्या. लहान लहान पुष्कळ कुटुंबं राहण्याची तिथें व्यवस्था होती. किती तरी अशीं कुटुंब पाखरांप्रमाणें तेथें येऊन त्या प्रचंड वृक्षाच्या डहाळीडहाळीवर आपापलीं घरटीं करून राहत होतीं जशीं काहीं. कुठून आलीं होतीं, कोण जाणे? झाडावर निवारा शोधायला आलेलीं पाखरं कुठून येतात, ह्याचा तरी कोणाला पत्ता असतो? बऱ्याचशा कुटुंबांनीं तिथें आपले संसार थाटले होते, एवढंच खरं. प्रत्येकाची व्यवस्था अगदीं स्वतंत्र होती. त्यामुळें एकाचा दुसऱ्याशीं संबंध-संपर्क येण्याचंहि कांहीं कारण नव्हतं. तीं सारीं कुटुंबं योगायोग म्हणून जवळ जवळ राहत असत एवढंच. बाकी एकमेकांत तसा आडवा समुद्रच पसरल्यासारखं होतं तिथें. बाहेरच्या रस्त्यालगत ओसरी. ती ओलांडून आंत आलं कीं रहायची मुख्य खोली. तिच्या पलीकडे स्वयंपाकघर, अन् त्याच्यापुढें पुन्हा ओसरी वगैरे. चांगली उंच भिंत बांधून एवढी जागा असल्याच इतर जागापासून निराळी काढून दिलेली. छोट्याशा कुटुंबासाठीं चांगली सोईस्कर जागा होती ती."

मी कांहींसा चिडल्यासारखा होऊन म्हणालों, "हें हो काय तुमचं, सोमेश्वर? गोष्टींतल्या इतक्या लहान सहान बारकाव्या ऐकण्याचा प्रसंग आला कीं माझे तर प्राण कासावीस व्हायला लागतात बाबा! म्हातारपणीं माणसाची सहनशक्तीहि ढिली पडल्यासारखी होऊन

जाते ना, म्हणून असेल; पण होतं खरं तसं. सरळ गोष्ट आपली सरळसरळच सांगितलेली ऐकायला बरी वाटते आपली."

सोमेश्वरांना हंसू आलं माझं बोलणं ऐकून. ते म्हणाले, "आपण दोघेहि म्हातारे झालों आहोंत आतां हेंच खरं ! अहो, तुम्हाला काय वाटतं ? गोष्ट म्हणजे काय नुसत्या घडलेल्या गोष्टीची जंत्री असते? तसं जर असतं तर कुठल्याहि वर्तमानपत्रांत नित्यश: प्रसिद्ध होणाऱ्या इकडच्या तिकडच्या घटना अन् त्यांचीं वर्णनं हेंच साहित्य होऊन बसलं असतं ना ! 'अ' नें 'ब' ची बायको पळवली ! झालं साहित्य ! –"

ऐकलं, अन् माझी पाचावर धारण बसली ! मनांत म्हटलं, कुणी ऐकलं तर नसेल ना ? ह्या म्हाताऱ्या वयांत बायकांच्या ह्या पळवापळवीच्या भानगडींत मी लक्ष घालतों, त्या ऐकायला मला बरं वाटतं, असं कुणाला वाटलं तर शेण नाहीं का घालणार ते माझ्या तोंडांत ? बरं, सोमेश्वरांना 'नको' म्हणावं तर तिकडूनहि पंचाईत !

पण माझ्या मन:स्थितीची त्यांना काय पर्वा ? ते आपले पुढें सांगूं लागले. म्हणाले, "तो गृहस्थ घर पाहून गेला, भाड्याचा ठराव वगैरे सारा झाला, घरहि त्यानं ताब्यांत घेतलं, अन् त्या दिवसापासून पुढें मात्र त्याचं दर्शन कधीं झालंच नाहीं आम्हाला. तो असतो कुठें, करतो काय, घरीं केव्हां येतो अन् पुन्हा बाहेर जातो केव्हा, आम्हाला कधींच पत्ता नव्हता. मी त्या वेळीं शाळेंत शिकत असें. नुकतंच शाळेंत टाकलं होतं मला. बाळपणच्या त्या काळांत सारंच कांहीं नवीन. प्रत्येकच गोष्टीबद्दल अपार उत्सुकता अन् कुतुहल ! मन कसं सदासर्वकाळ ताजं टवटवीत अन् प्रत्येक गोष्टीवर जसं कांहीं टपलेलं असायचं ! त्या काळच्या इतक्या पुष्कळशा गोष्टी मला अगदीं स्पष्टपणें आठवतात अजूनहि, त्याचं कारण एकच. त्यांच्याकडे पाहाण्याची माझी दृष्टि औत्सुक्यानें भरलेली होती. हं.

तर काय सांगत होतों मी ? हं, आठवलं आतां. त्या गृहस्थाला तर आम्ही पुन्हां कधीं पाहिलंच नाहीं. त्याच्या घरांतहि कोण कोण माणसं आहेत वगैरे गोष्टींचा बरेच दिवस आम्हाला पत्ता नव्हता. पण, एके दिवशीं मला त्यांच्याकडे एक मुलगी दिसली. माझ्याच वयाची, सात आठ वर्षांची असेल ती देखील. "

" पुन्हा तुमची ती मृणालच आली वाटतं ! " मी म्हणालों.

माझे शब्द कानीं पडले अन् सोमेश्वरांनीं डोळे उघडले. व्हिस्कीचा अंमल चांगलाच चढलेला दिसत होता त्यांच्यावर. प्रशान्त दृष्टीनें माझ्याकडे पाहात, माझ्या प्रश्नाकडे संपूर्ण दुर्लक्ष करून ते पुढें सांगूं लागले, " शरीरानें चांगली जाड-जूड, गोल गोल ! तोंडाची पराकाष्ठेची वाचाळ, भारी दांडगी अन् खोडकर, अशी होती ती मुलगी. जेव्हां पहावं तेव्हां ती रात्रंदिवस आपली खालच्या मजल्यावर, आंगणांत इकडे तिकडे हिंडत राही अन् जोरजोरानें गळा काढून आरडा ओरडा करीत बसे. तिला पाहिलं, अन् मला तिचा रागच आला. आमच्या त्या सबंध वाडाभर दांडगेपणाबद्दल माझी कीर्ति पसरलेली होती. पण, ही पोरगी जशी कांहीं त्या बाबतींत मला खालीं पहायला लावून माझा लौकिक धुळींत मिळवायलाच निघाली होती ! मग कोणाला राग येणार नाहीं तिचा, सांगा पाहूं ? तिचं नांव होतं बानू ! "

" बानू ? "

" हं.–काहींसं विजातीय नांव आहे, पण होतं खरं तिचं तें नांव. —आठ वर्षांच्या वयांतच मी ह्या बानूच्या प्रेमांत सांपडलों ! "

" अरे ! अरे ! अरे ! काय हें सोमेश्वर ? कोणी ऐकेल ! " इकडे तिकडे पाहून आपल्या जागेवर जरा सांवरून बसत मी म्हणालों. मनांत म्हटलं, झालं ! आतां ह्यांच्या गोष्टी कोणत्या थराला जातील, परमेश्वराला ठाऊक !

पण, मी काय अन् माझं बोलणं काय,–सोमेश्वरांच्या खिजगण-

तींतच नव्हत्या त्या गोष्टी. ते आपल्या रंगांतच मस्त होते. माझ्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून ते पुन्हा पूर्वीप्रमाणेंच पुढें सांगूं लागले. म्हणाले, "त्या वयांत माणसाला कळतं काय ? कांहींच नाहीं. आपण स्वत:च एक प्रचंड रहस्यासारखे स्वत:ला वाटत असतों त्या वयांत. मी मघाशीं म्हणालों खरा प्रेमांत सांपडलों म्हणून. पण प्रेम कशाशीं खातात, त्याची मला कुठली कल्पना असायला ? मला जें बानबद्दल वाटत होतं तें होतं नुसतं एक विलक्षण आकर्षण. त्या आकर्षणाचा अर्थ काय, तेंहि मला कळत नव्हतं. आंधळेपणाच होता तो एक प्रकारचा. पण, मला आपल्या खोलींत बसून राहवेना, एवढं मात्र खरं ! शेवटीं एक दिवशीं उठलों, अन् स्वत:च गेलों तिच्याकडे आपण होऊन तिची ओळख करून घ्यायला, तिच्याशीं मैत्री जुळवून घ्यायला. पण नामोहरम व्हावं लागलं मला. ती मात्र फाडकन् असं कांहीं टाकून बोलली म्हणतां ! – हा अनुभव मला अगदीं नवीन होता. मैत्रीएवजीं शत्रुत्व पदरीं पडलं माझ्या ! ह्या गोष्टीचा जो अवश्यभावी परिणाम व्हायचा ठरलेला, त्यालाहि मग फारसा अवकाश लागला नाहीं. बानूनें एक दगड घेऊन माझ्या कपाळावर असा कांहीं भिरकावला कीं माझ्या डोक्याला खोक पडून भळभळां रक्त वहायला लागलं. ही पहा ह्या इथें, कपाळावर. माझ्या ह्या पहिल्या वहिल्या अपमानाची खूण अद्यापिहि कायम आहे."

मी म्हटलं, "हं ऽ ! ह्या असल्या बाल्यप्रेमाच्या गोष्टी तरुणांच्या साहित्यांत वाचल्या आहेत मी."

"त्या दिवशीं घरीं आल्यानंतर, माझ्या कपड्यावरचे रक्ताचे डाग अन् कपाळावरची जखम पाहून घरांत एकच विचारपूस सुरु झाली. पण, 'मी पडलों अन् दगडावर डोकं आपटलं', ह्यापलीकडे दुसरं कांहींहि सांगूं शकलों नाहीं मी घरीं. माझी बानू नांवाची एक सवींत मोठी वैरीण आहे, तिचा हा प्रताप, ही गोष्ट कांहीं निघाली नाहीं माझ्या तोंडून ! खरंच सांगतों तुम्हाला. त्या दिवशीं तरी बानू-

खेरीज दुसरा माझा शत्रु जगांत कोणीहि नव्हता. अगदीं मनापासून मी तिचा द्वेष करीत असल्यासारखं वांटत होतं मनाला. म्हणूनच तावातावानें मी गेलों तिच्या आईकडे तिच्याबद्दल कागाळी करायला. म्हटलं पहा, तुमच्या मुलीनं माझ्या डोक्याला केवढी खोक पाडली ! म्हणून बानूच्या आईचंच वर्णन सांगतों मी आतां तुम्हाला."

"बायकांच्या संबंधींच गोष्टी बोलायला तुम्हाला फार आवडतात, ठाऊक आहे मला, सोमेश्वर ! तारुण्य गेलं, प्रौढ वयहि मागें पडलं अन् आतां हें म्हातारपण आलं. तरी देखील हा तुमचा दोष कांहीं गेला नाहीं !"

सोमेश्वर म्हणाले, "जावा कसा ? अन् कां जावा ? पुरुष अन् प्रकृति ह्यांचा संबंध तर तुम्हाला ठाऊकच आहे. पुरुषाची दृष्टि खिळलेली असते प्रकृतीवर. ह्या दोहोंना एकत्र बांधून ठेवणारं बंधन कधीं तरी तुटणं शक्य आहे का ? सारा खेळ आहे नुसता ऊन-सावलीचा ! कधीं ओळख पटते, कधीं ती पटत नाहीं, तर कधीं ओळख पटूनहि न पटल्याचा आव आणायचा ! लपंडाव म्हणतात ना ? हुं ! आज माझ्या डोळ्यापुढें बानूच्या आईची ती मूर्ति जशीची तशी स्पष्ट उभी आहे. ती कशी होती तें मला तुम्हाला नीट समजावून सांगता येणं कठीण आहे. कितीहि कुशलपणानें शब्द वापरले तरी ते अपुरेच पडणार, ठाऊक आहे मला."

मी आपला उठलों, अन् आंतलं दार ओढून घेऊन पुन्हा आपल्या जागीं येऊन बसलों. ही गाडी कोणत्या रूळावरून जाणार तें स्पष्टच दिसत होतं मला. तेव्हां शक्य तेवढी खबरदारी घेऊन ठेवणं प्राप्तच होतं.

सोमेश्वर सांगूं लागले, "माझ्या कल्पनेप्रमाणें, तिचं वय कांहीं फारसं नसावं अन् तिचं रूप ! तिच्या रूप-सौन्दर्याची आठवण [illegible]

माझ्या तरुणपणीं मनांत जागी झाली कीं अंतःकरणांत जशा कांही अतिमधुर संगीताच्या गोड लहरी झणझणुं लागत पहा ! "

ते कांही वेळ स्तब्ध बसून राहिले. त्यानंतर पुन्हा सांगूं लागले, " मी गेलों होतों तिच्याकडे बानूची कागाळी घेऊन. माझं म्हणणं तिनें ऐकून घेतलं, अन् मग मोठ्या ममतेनें, किंचित् हंसून ती म्हणाली, ' अरे अरे ! तुला मारलं ना तिनें ! कार्टी भारीच दुष्ट आहे नाहीं तरी ! काहीं केल्या ऐकत नाहीं ! ये बाळ, ये ! पाहूं, कुठें लागलं आहे ? ये, आतां चुना अन् हळद लावून देतें जखमेवर कीं मग बरं वाटेल तुला !' असं म्हणत तिनें मला हात धरून आपल्या जवळ घेतलें. तिच्या त्या हाताच्या स्पर्शांत विलक्षण भ्रातृस्नेह ओसंडत होता जसा काहीं. काय होतं त्या हस्तस्पर्शांत, तें शब्दांनीं नाहीं सांगतां येणार मला. त्या मातृस्नेहानें ओथंबलेल्या स्पर्शाचं सुख मला लाभलं ! आपल्या शरीरांतल्या रक्ताची किंमत देऊन मी तें मिळवलं होतं ! "

पुन्हा कांहीं वेळपर्यंत सोमेश्वर स्तब्ध बसून राहिले. नंतर ते म्हणाले, " मला आठवते, अजूनहि अगदीं स्पष्टपणें आठवते तिची ती दृष्टि ! स्नेहानं अन् ममतेनं भरलेली ! मला बरंच लागलं होतं. त्याच्या वेदना तिच्या त्या मोठ्या मोठ्या डोळ्यांत उमटल्या होत्या. थोडीशी भीतीची कातरता, वात्सल्य ह्या सर्वांचं मिश्रण तिच्या उज्वल डोळ्यांत उमटून एक निराळीच शोभा दिसत होती. तिची ती नजर मी विसरणं शक्य नाहीं. ज्याला साहित्याच्या परिभाषेंत ' अपरूप लावण्य ' म्हणतात ना ? तें मला तिच्या ठिकाणींच आढळलं ! श्रीमंताचा मुलगा मी ! माझ्या कुटुंबांत, मला अंगा-खांद्यावर घेऊन नाचायला सदैव तयार असणाऱ्या माणसांची कांहीं उणीव थोडीच होती ? जवळचे तसेच लांबचे नातेवाईक, जबरदस्तीनें संबंध जुळवायला धडपडणारे दुसरे आशाळभूत, नोकर-चाकर अशासारख्याच माझ्या आप्तगणांचं कडबोळं माझ्या भोवतीं-भोंवतीं नेहमींच

गोंडा घोळायला तयार असायचं ; पण त्या सर्वांकडून माझ्यावर ज्या ममत्वाचा वर्षाव होत असे तो स्वार्थांतून निर्माण झालेला, अन् पुष्कळसा आत्यंतिक स्वरूपाचाच असे. खरी खरी आत्मीयता, खरा जिव्हाळा त्यांत कमीच ! पण बानूच्या आईच्या हृदयाच्या लावण्यांत मला खरोखरीचा, अंतरीचा जिव्हाळाच फार मोठ्या प्रमाणांत अनुभवास मिळाला ! ह्याचा परिणाम असा झाला कीं, तिनें आपल्याला पोटाशीं घ्यावं, कुरवाळावं, आपलं सांत्वन करावं, अशा लोभापायीं बानूकडून स्वतःवर अत्याचार घडले तरी त्याचं मी मोठ्या आनंदानें स्वागतच करूं लागलों. "

सोमेश्वरांनीं चालविलेले बानूच्या आईचे हे स्तुतिपाठ मला कांहींसे अमर्यादित स्वरूपाचे वाटले. माणूस चांगलं असूं शकतं, फार चांगलं असूं शकतं ! कबूल आहे मला. पण, म्हणून काय त्याला असं अगदीं देवकोटींत नेऊन बसवायचं ? आपल्याला कांहीं हें आवडत नाहीं. माणसामाणसांचा स्वभाव असतो एक एक, असं म्हणा हवं तर तुम्ही. पण मला कांहीं सोमेश्वरांनीं चालविलेली ही स्तुति रुचली नाहीं, एवढं मात्र खरं. मी म्हणालों, " सोमेश्वर, मला ठाऊक आहे तुमचा स्वभाव. स्त्री म्हटली कीं तिच्या ठिकाणीं सारे आदर्श आहेतच अशी कल्पना करून घेऊन पहायची संवयच आहे तुमची. पण आपल्याला कांहीं हें पटत नाहीं बुवा. माणसाच्या स्वभावाची, त्याच्या व्यक्तित्वाची खरी ओळख अशानें का होते ? अहो, हा तर एकांगीपणा झाला. अन् तो देखील नुसता सेंटिमेंटल एकांगीपणा ! रॅशनल, रिॲलिस्टिक दृष्टीनें पाहिल्याखेरीज माणसाच्या व्यक्तित्वाचं ऑब्जेक्टिव्ह तथ्य हातीं लागणं . . '

" अबबब ! पुरे, पुरे झालं बाबा ! तुमच्या या साऱ्या जडजंबाल शब्दभडीमाराचा अर्थ कळणं माझ्यासारख्याला कठीण आहे ! मी आपला साधा-सुधा, जें जसं अनुभवाला झालं तसंच खरं मानून चालणारा माणूस आहें. हिंदुस्तानात जन्माला आलों आहें, ह्याच

भूमीच्या संस्कारांत लहानाचा मोठा झालों आहें. मला पूर्णपणें दिसून आलं आहे, पटलं आहे, कळून चुकलं आहे, ज्याला अमृत म्हणतात ना, तें खरं खरं असतं स्त्रीच्या हातांतच! आमच्या आत्म्याच्या अमर संगीताचे निनाद स्त्रीच्या कंठस्वरांतूनच उमटत असतात!"

ह्यावर काय बोलणार मी? गप्प बसलों, झालं! व्हिस्कीबद्दलचा माझा आदर अन् श्रद्धा मात्र त्यामुळें वाढली खरी! मनांत म्हटलं, अशा वस्तूवर जे बायकॉट टाकायला सांगतात, ते खरोखरी भारतीय संस्कृतीचे परम शत्रूच!

सोमेश्वरांनीं आपलें वक्तव्य पुढें सुरू केलें. ते सांगू लागले, "तुम्हाला माणसाची स्तुति केलेली फारशी आवडत नाहीं, असं दिसतं."

मी मधेंच वाक्य तोडीत म्हणालों, "अंहं! तसा नाहीं माझ्या म्हणण्याचा अर्थ. असा विपर्यास नका करूं माझ्या बोलण्याचा! माझं म्हणणं एवढंच, कीं–"

"आलं लक्षांत माझ्या, तुमचं म्हणणं काय आहे तें!" सोमेश्वर किंचित हंसून म्हणाले. "हवा कशाला वाद? मी तुम्हाला, अगदीं तुम्ही म्हणतां तसंच, ऑब्जेक्टिव रिॲलिटीचं वर्णन करूनच सांगतों झालं! हं. तर अशी ती बानू अन् तिची आई! त्यांच्याकडे माझं जाणं-येणं बरंच वाढलं होतं. पण त्यांच्यासंबंधीं जें कांहीं मी पाहिलेलं आठवतं, त्यांत ह्यांच्या संसारांत ह्या दोघी माय-लेकीच्या पलीकडे तिसरं माणूस कोणी कधींच मला दिसलं नाहीं. दोघी अगदीं एकट्याच असल्यासारख्या होत्या. आई स्वयंपाक करायची. मुलगी पलीकडच्या दुकानांतून काय हवं नको तें विकत आणायची. कधीं मधीं आईदेखील बाजार आणायला स्वतःच जायची, अन भाजी–पाला, तेल-तूप, धान्य–धुन्य विकत घेऊन यायची. मी सदोदित त्यांच्या पाठीशीं, सावलीसारखाच पण त्यांच्यापासून

थोडासा दूर असाच वावरत असायचा. तिसऱ्या प्रहरच्या वेळीं बानूची आई सुरेल स्वरांत महाभारत वाचायची, अन् बानू तिच्या शेजारीं बसून तें ऐकायची. महाभारताच्या कथेचा आस्वाद मी आयुष्यांत पहिल्यांदां चाखला तो त्या वेळीं. विदुराची गोष्ट मी खिडकीशीं गुपचुप चोरून लपून बसून पहिल्यांदा तिच्या तोंडून ऐकली होती ! अन् ते निरनिराळे प्रसंग ती वाचूं लागली, सांगूं लागली कीं माझ्या डोळ्यांत पाणी उभं राही ! "

मला नवल वाटलं हें ऐकून, मी विचारलं, " कां बरं ? त्यांत डोळ्यांत पाणी येण्याचं काय कारण ? "

सोमेश्वर म्हणाले, " काय कारण तें मलाहि सांगतां येत नाहीं. त्या वेळीं काय व्हायला लागायचं माझ्या मनांत, तें आज देखील मला कळत नाहीं. पण होत होतं खरं मात्र ! माझं सारं लहानपण जसं कांहीं कशाचा तरी शोध काढीत, वणवण करीत हिंडण्यांतच निघून गेलं. अन् आज हें म्हातारपण आलं; पण तरीहि काय शोधीत होतों तें मिळालं म्हणतां का ? ह्या वयांतसुद्धां ती शोधाशोध चालूंच नाहीं का ? आजहि आंतून असं उफाळून आल्यासारखं होतं, कशासाठीं तरी मन व्याकुळतं. फरक एवढाच कीं, आतां फक्त उसासेच बाहेर पडतात, डोळ्यांत पाणी येत नाहीं ! एकांतांत, एकटाच बसून मी कितीदां अन् किती आसवं गाळलीं आहेत आजवर, ती सांगायची गोष्ट नाहीं. तरुणपणीं ह्याचा जो कांहीं अर्थ मला कळला तो हाच; एकटेपणा असला कीं माझ्या डोळ्याला पाणी यायचं ! "

" हं ऽ! असते अशी घडण एकाद्या माणसाच्या मनाची ! नदीच्या कांठालगतची माती असते ना ? ती माती वरून दिसते अगदीं कोरडी. पण आंत बोट खुपसलं, कीं सळकन् आपलं पाणी वर आलंच ! तसंच तुमच्यासारख्यांचं मन ! कोमल हळवेपणाच फार; त्यांच्याजवळ पौरुषत्वाचा कठोर दणकटपणा नसतोच अशीं

माणसं, म्हणजे पुरुष जातीच्या दुर्बळपणाचीं निदर्शक चिन्हंच असतात." मी म्हणालों.

सोमेश्वर म्हणाले, "कोणी सांगावं ? असेलहि कदाचित् तसं ! तुम्ही म्हणतां त्याप्रमाणं तो माझ्या मनाचा दुबळेपणाहि असेल कदाचित् ! पण जाऊं द्या तें. मी सांगत होतों तुम्हाला त्या मायलेकींबद्दल. बारीक सारीक गोष्टींचा उल्लेख करीत नाहीं मी. फक्त मुद्याच्या गोष्टीच तेवढ्या सांगतों. बानूची आई फारशी कुठं जातयेत नसे. पण पाय उचलून कुठं गलो-आली, कीं जमिनीच्या छातीवर आपल्या पायाचा आघात होईल कीं काय अशा भावनेनं, जणू काय, ती अगदीं जपून, तोलून पावलं टाकायची ! आमच्या वाड्यांतहि ती यायची अधून मधून. इतर शेजारणी-पाजारणीसारखी आली म्हणजे कधीं मधीं छोटीं-मोठीं कामंहि करून टाकायची आमच्या घरांतलीं. एक-दोनदां तर, तिनें घरांतल्या दोन वाट्या पेलेहि घासून विसळून दिल्याचं मला आठवतं. तिच्या साऱ्या व्यवहारांत एक प्रकारची कोमलता भरलेली असायची. तोंडावर जेव्हां पहावं तेव्हां हंसू दिसायचं; पण त्या हंसण्याच्या रेषेंत आनंदोल्हासापेक्षां एक प्रकारचं कारुण्य, एक प्रकारचा कुंठितपणाच अधिक ! जशी कांहीं ती स्वतःला इतर सर्व माणसांपुढें अगदींच तुच्छ, कमी लेखीत असावी. अन् खरोखरीच तसं झालंहि. एक दिवस असा उगवला, कीं त्या दिवशीं हीच बानूची आई जगाच्या दृष्टीनें अगदींच टाकाऊ, तुच्छ ठरविण्यांत आली ! माणसाचं मन खरोखरीच पापाचं भांडार असतं पहा. त्याला नाहीं सौजन्याची किंमत, त्याला नाहीं नम्र, गोड वर्तनाची पारख, त्याला नाहीं आपल्याला नाहींसं करून दुसऱ्यासाठीं झिजणाऱ्याच्या उदात्ततेची ओळख ! आत्मसमर्पणांतली भव्यता माणूस ओळखूं शकला नाहीं तिच्या ! अंहं, घाबरूं नका तुम्ही. ऐका नीट. अश्लील गोष्ट ही नाहीं."

"तेवढंच एक सांभाळा म्हणजे झालं. माझं दुसरं काही म्हणणं नाहीं."

"असेच दिवस जाऊं लागले. बानूशीं आतां माझी चांगलीच मैत्री जमली होती. जेव्हां पहावं तेव्हां आम्हीं दोघे बरोबरच असायचे. ज्याला तुम्ही बाल्य प्रेम–काफ लव्ह म्हणतां तेंच हें होतं कीं दुसरं कांहीं, तें मी सांगू शकत नाहीं. पण ती मला माझी अगदीं अतिशय जवळची, माझी परम आत्मीय असल्यासारखी वाटायची एवढं खरं. अगदीं अंतरात्म्याच्या आपुलकीनं मी तिच्याशीं बांधला गेलों होतों. मी जसा कांहीं देह अन् ती होती मन ! मी वायु, तर ती होती अग्नि ! पण, आमच्या ह्या अविच्छिन्न सहवासाची अन् आपुलकीच्या भावनेची दुसरीहि एक बाजू होती. ते लोक होते गरीब, दरिद्री, दुर्बळ ! त्यामुळें आमच्या घरांतल्या साऱ्या लोकांची त्यांच्याकडे पाहण्याची दृष्टि, आपण त्या लोकांवर जसे कांहीं उपकार करतों आहोंत, त्यांच्यावर दया करतों आहोंत, अशासारखी होती. बानूच्या वडिलांना तर आमच्या घरांतल्या लोकांनीं कधीं पाहिलं तरी होतं कीं नाहीं, भगवान जाणे ! चुकून-माकून, कधीं तरी ते माझ्या दृष्टीला पडत, पण कधीं तरी-सहामासी असा प्रसंग आला तर आला ! अन् तशा प्रसंगीं देखील मी त्या गृहस्थाला तोंड उघडून बोलताना तर कधीं पाहिलंच नाहीं. गुपचूप यायचा आपला, अन् तसाच गुपचुप, कांहीं न बोलतां निघून जायचा ! मला तर तो आलेला दिसला कीं एक प्रकारची भीतीच वाटायची ! बानूची आई तरी त्याच्याशीं कसं अन् काय बोलत असेल, तें मला कळेना ! असेच दिवस चालले होते."

"हं ऽ"

"अन् मग एके दिवशीं साराच प्रकार अगदीं उलटा-पालटा होऊन गेल्यासारखा झाला ! एकादी वावटळ यावी अन् तिच्यांत सांपडून सारा पाला-पाचोळा अन् धूळ उडून कुठें उडून जावी, तशा-

सारखं झालं ! कशामुळं कुठून काय झालं म्हणजे काय होतं, कोणत्या कार्यांचा कुठल्या कारणाशीं कसा संबंध असतो, हें कळण्यासारखं माझं वय नव्हतं त्या वेळीं. एवढंच नाहीं तर, कारणाशिवाय कार्य होत नाहीं, हें देखील मला त्या वयांत समजत नव्हतं. पुष्कळ दिवस होऊन गेले त्या गोष्टीला ! त्यानंतरहि आयुष्यांत पुष्कळ गोष्टी पाहिल्या आहेत मी. अन् त्यांपैकीं कित्येक गोष्टी तर, त्या पहिल्या गोष्टीपेक्षांहि अधिक विलक्षण, समजायला कठिण अन दु:खदायक आहेत. पण–पण, आयुष्यांत पहिल्यानेंच पाहिलेली ती गोष्ट ! तिच्यामुळें जसे कांहीं डोळे उघडल्यासारखे झाले माझे.

कुतुहलपूर्ण दृष्टीनें मी सोमेश्वरांकडे पाहूं लागलों. हुक्क्याची नळी माझ्या हातांतच राहिली.

" त्या दिवशीं सकाळीं मी जागा झाल्यानंतर पाहिलं, सारं वातावरणच पार बदलून गेल्यासारखं झालं होतं. सबंध वाड्यांत जिकडे तिकडे भयंकर निंदा, घाणेरडी टवाळकी अन् कुत्सितपणानें हंसणं ह्यांचं सत्रच सुरू झालं होतं जसं कांहीं. अन् आमच्या कुटुंबांतीलच एक प्रौढ अन् बुद्धिमान बाई बानूच्या आईला उद्देशून, मारे तावातावानें, स्त्रियांच्या चारित्र्यावर निर्दयपणें ताशेरे उडवीत व्याख्यानबाजी करण्यांत गर्क झाली होती ! काय तें बोलणं ! काय ती बीभत्स थट्टा ! काय तो कुत्सितपणा ! काय ते अमंगळ घाणेरडे आरोप ! शि: ! तुम्हाला ठाऊक आहे, बायकांच्या जातीचा सर्वांत प्रबळ शत्रु कोण तें ? स्त्रियाच ! बायकांच्या विरुद्ध बायकाच किती भयंकरपणानें वागूं शकतात, तें पाहिलं कीं थक्क होतो माणूस ! त्या दिवशींचं तें तुफान कसं उठलं होतं, त्याचं यथातथ्य वर्णन करून मला सांगतां यायचं नाहीं तुम्हाला. पण कां म्हणून ? कशामुळें उठलं होतं हें सारं वादळ ? बानूच्या आईच्या हातून असा अपराध तरी कोणता घडला होता ? तेंच सांगतों ऐका. "

" जरा हळूं, खालच्या स्वरात बोला बुवा. सोमेश्वर ! "

" त्या दिवशीं मी पाहिलं, मनुष्य-प्राणी किती भयंकर असतो तें! ज्यांच्या आश्रयानें मी लहानाचा मोठा होत होतों, जे माझे परम आत्मीय, रक्ताच्या नातेसंबंधांतले, तेच सारे एकाद्या भयंकर हिंस्त्र पशुपेक्षांहि किती विषारी, दुष्ट, निर्घृण होते, ते मी त्या दिवशीं डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहिलं ! बानूच्या आईची आमच्या वाड्यांतून हकालपट्टी करण्याची व्यवस्था चालली असल्याचं माझ्या कानीं आलं. बिचारी बानू ! कोणा एकाद्याजवळ ती गेली कीं लगेच त्या माणसानें नाक उडवायचं, तिच्याकडे तिरस्कारानें पाहायचं, अन् लूद भरल्या कुत्र्याला 'हड ! हड ! ' करतात तशासारखं तिला आपल्याजवळून दूर हांकलून लावायचं ! कोणी तिला जवळ उभी सुद्धां करी ना ! मी वयानें लहान होतों. त्यामुळें, माणूस म्हणून मला मानायला कोणी अर्थातच तयार नव्हतं. त्यांच्या दृष्टीनें मला व्यक्तित्व असं कांहीं नव्हतंच. त्यामुळें माझा विचार करण्याची किंवा मला विचारांत घेण्याची त्यांना गरज कुठली ? पण चाललेला सारा प्रकार मी पहात होतों. अन् पाहून, माझं मन एकच गोष्ट मला सांगत सुटलं होतं, निष्ठुर ! हीं सारीं माणसं अत्यंत निष्ठुर आहेत. ह्यांच्या निर्दयपणाला, ह्यांच्या क्रौर्याला सीमा नाहीं ! बानूची आई असेल अपराधी. झाली असेल तिच्या हातून चूक. पण तिच्या चुकीबद्दल तिला प्रायश्चित्त द्यायला निघालेली ही सारी मंडळी, हे तर बार्बर आहेत, शुद्ध पशु आहेत ! हंः ! काय आश्चर्य आहे पहा ! माझ्या घरांतला प्रत्येकच इसम, प्रत्येक स्त्री अन् प्रत्येक पुरुष, म्हणजे एक एक थोर सत्पुरुष आहे, सच्चरित्र साधु आहे, ह्याची कल्पनाहि मला नसावी ! अन् त्या दिवसापासून सच्चरित्र माणसाला पाहिलं कीं भीतीनें माझा थरकांप उडतो अगदीं."

"हंऽ !"

" मी आपला तोंड लपवून इकडे तिकडे हिंडत होतों सारा वेळ.

ज्या बानूच्या गळ्यांत गळा घालून सारा दिवस इकडं तिकडे हिंडणें, हंसत खिदळत खेळांत दंग होऊन राहणं, हाच माझा नित्याचा उद्योग, त्याच बानूपासून दूर होण्याचा माझ्यावर आज अचानकपणें प्रसंग ओढवला होता. कोणी तिला माझ्याजवळ येऊं देत नव्हतं, कीं मला तिच्यापर्यंत जाण्याची सोय नव्हती ! लहान वयांत बुद्धि अन् विचार-विवेकापेक्षां हृदयाच्या भावनांचा खेळच अधिक चाललेला असतो. घरांतल्या माणसांच्या अडथळ्यांना न जुमानतां, त्यांचा डोळा चुकवून मी बाहेर पडलोंच. दूर आवाराच्या एका कोपऱ्याशीं बानू उभी असलेली मला दिसली. माणसांची वर्दळ अन् रोखलेल्या नजरा चुकवून तिच्यापर्यंत जाण्याची सोय नव्हतीच. दुरूनच नुसत्या नजरेच्या सहाय्यानेंच मी तिच्याशीं बोलण्याचा प्रयत्न करीत होतों. मधेंच तिची आईहि दृष्टीला पडली. पदरानें डोळे सारखी पुशीत राहिल्यामुळें तिचे डोळ सुजल्यासारखे, लाल झालेले दिसत होते. मनाला सारखं वाटत होतं, जावं, अन् तिच्या जवळ जाऊन उभं राहावं ! पण जायचं कसं ? आम्ही सर्वांनींच तिच्याशीं शत्रुत्व पुकारलं होतं. ज्या घरांतल्या यच्चयावत् लोकांनीं तिला हुसकावून लावण्यासाठीं चंग बांधलेला होता, तिच्याविरुद्ध कट रचल्यासारखं केलं होतं, त्याच घरांतला, त्याच लोकांपैकीं मीहि एक ! इतर सर्वां-प्रमाणें माझ्याबद्दलहि जर तिच्या मनांत अविश्वास उत्पन्न झाला असला तर ? अशा परिस्थितींत तिच्याजवळ जाऊन उगाच अपमान करून घेण्यांत तरी काय अर्थ होता ? "

मी म्हणालों, " हंऽऽ ! म्हणजे, ती बाई आपली वर्तनानें अशी तशीच होती, असंच कीं नाहीं ? "

" तें खरोखरी काय होतें, तें आजहि मला स्पष्टपणें कळूं शकलेलं नाहीं ! " सोमेश्वर म्हणाले. " पण, एवढं मात्र खरं कीं, माण-साला, माणूस म्हणण्यापेक्षां स्त्रीला जगांतून उठवून लावायला हें एवढं एकच कारण असूं शकतं ! हें असंच चालतं जगांत, ह्याची

जाणीव मला पुढें, मी मोठा झाल्यानंतर झाली. अगदीं सहजासहज माणसाचा अपमान करून टाकायला ह्यासारखं प्रभावी अस्त्र नाहीं दुसरं !"

" जाऊं द्या सोमेश्वर. मरणकाळ आपला जवळ आलेला आहे. अशा वयांत चारित्र्यहीनतेचं वकीलपत्र घेऊन त्याची तरफदारी करूं नका तुम्ही !"

सोमेश्वर म्हणाले, " बानूची आई वर्तनानें बिघडलेली होती, चरित्रहीन होती, कीं नव्हती तें खरोखरी एक परमेश्वरालाच ठाऊक. पण समजा, ती तशी असली, तरी तिच्या अंगीच्या सौजन्याला, सज्जनपणाला तुम्ही काहींच का किंमत देणार नाहीं ? ती कांहीं आमच्या अन्नावर पोसली जाणारी, आमची आश्रित नव्हती ! तिनें आमच्या वाड्यांतली जागा भाड्यानें घेतलेली होती. महिन्याच्या महिन्याला भाड्याचे पैसे मोजीत होती चांगली ! जोंपर्यंत ती आपलं भाडं चुकतं करीत आहे तोंपर्यंत तिथें राहण्याचा तिला हक्क आहे, ती आम्हां सर्वांच्या नाकावर टिच्चून त्याच जागेंत राहूं शकते, अन् आम्हा बलवानांच्या बरोबर लढा द्यायलाहि तयार होऊं शकते, ही गोष्ट आम्ही सारे त्या दिवशीं विसरून गेलों होतों. पण तिनें आम्हाला त्या गोष्टीचं प्रत्यंतर आणून दिलं."

" काय म्हणतां ?"

" तेंच सांगतों मी तुम्हांला. अती झालं म्हणजे दगडसुद्धां तापतो अन् धरणीहि भाजून काढूं लागते जगाला ! मग ती तर किती झालं तरी रक्ता-मांसाची माणूसच ! शेवटीं, मीं पाहिलं, ही थंड माती-सुद्धां तापली ! एकसारख्या अपमानाच्या माऱ्याविरुद्ध बानूची आईहि शेवटीं ताठ मान करून सामना द्यायला पुढें आली ! म्हणाली, 'मी इथें राहतें ती काहीं फुकट राहत नाहीं. चांगले भाड्याचे पैसे मोजतें खण्‌खण् ! मी सोडणार नाहीं जागा ! पाहतें कोण मला इथून काढून लावतं तें !' हें ऐकून माझे सारे नातेवाईक

पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणें तिच्यावर एकदम तुटून पडले. घरांतल्या बायकांनीं जें तिच्यावर तोंड सोडलं तें विचारूं नका. सुसभ्य म्हणविल्या जाणाऱ्यांच्या मनांत इतक्या असभ्यपणानें बरबटलेल्या गोष्टीहि दडून बसलेल्या असतात हें पाहून मला आश्चर्य वाटलं. आमच्या घरांतल्या एकीनें अगदीं निर्लज्ज भाषेंत एका विशिष्ट गल्लीच्या नांवाचा उल्लेख करून तिला स्पष्ट शब्दांत सांगून टाकलं, तिच्यासाठीं रहायला योग्य जागा तिथें आहे, ह्या वाड्यांत नाहीं ! आणि मग, बानूच्या आईनेंहि तिच्यावर तोंड सोडलं ! जितक्या तावातावानें हा पक्ष हल्ला चढवायचा, तितक्याच निकरानें तीहि त्यांना प्रत्युत्तर देऊन त्यांचा प्रतिकार करूं लागली ! ज्या बाईला कधीं कोणी तोंड उघडून स्पष्टपणें बोलतांनाहि पाहिलं नव्हतं, तिलाच आतां असं उंच स्वरांत किंचाळतांना ऐकून वाड्यांतले सारेच लोक आश्चर्यचकित होऊन गेले ! हा जो प्रकार त्या दिवशीं घडलेला मी तुम्हाला आत्तां सांगितला, त्याचं मर्म काय तें आलं का तुमच्या लक्षांत ?अन्याय अन् अत्याचार ज्या वेळीं स्वतःला विसरून जाऊन, बेभानपणें पुढें सरसावूं लागतो, त्या वेळीं अगतिक दुर्बलता निरुपायानें शेवटीं त्या अन्यायाचा, आक्रमणांचा विरोध करायला लागतेच. हें किंचाळणं, ही आरडाओरड, हा हाहाःकार हेंच त्याचं नांव. ह्याच आक्रोशानें, हाहाःकारानें, आर्तनादानें जगाचा कोपरा नि कोपरा आजपर्यंत अनेक वेळां दुमदुमून गेला आहे, अन् पुढेंहि तो वेळोवेळीं दुमदुमत राहील ! ”

“ तें जाऊं द्या. पुढें काय झालं तें सांगा. ”

पुढें काय व्हायचं ? अशा प्रसंगीं जें होतं, तेंच त्या वेळींहि झालं. गांवांतले चार शिष्ट गोळा झाले. समजुतीच्या अन् शहाणपणाच्या गोष्टी सांगूं लागले. उपदेश करायला लागले. त्यांनीं सांगितलं, “ हवीं कशाला हीं भांडणं अन् ही कच्कच् ? तुम्ही आपली ही जागा सोडून दुसरीकडे निघून जा, झालं ! ”

" हं ! अन् ह्या साऱ्या भानगडी चालू होत्या त्या वेळीं तो गृहस्थ, बानूचा बाप, तो कुठें होता ? तो नाहीं का पुढें झाला ? "

" बानूचे वडील ना ? ते तर अगोदरपासूनच बेपत्ता झालेले होते. बानूच्या आईला त्यांचा पत्ताहि ठाऊक नव्हता. त्यांच्याशीं तिचं नातं खरोखरीच कशा स्वरूपाचं होतं, तेंहि तिला पटवून देतां आलं नाहीं लोकांना. कधीं तरी तो यायचा अन् जायचा, एवढंच ! "

" छान ! "

" त्यानंतर एकदोन दिवसांनीं मी पाहिलं, पोलीसांची एक तुकडी रस्त्यावर येऊन उभी राहिली. त्या लोकांनीं बानूच्या आईचं घर वेढून घेतलं. मनुष्यप्राणी किती नीच बनूं शकतो, क्षुद्रपणाच्या कोणत्या पायरीवर तो उतरूं शकतो, तें मीं त्या दिवशीं पाहिलं ! मी दुसऱ्या मजल्यावर खोलीच्या खिडकीशीं उभा राहून सारा प्रकार पहात होतों. दीनदुबळ्या, दरिद्री लोकांचा त्राता परमेश्वरही नाहीं, हें मी त्या दिवशीं डोळे फाडून पाहून घेतलं! पोलीसचे शिपाई मिळून तिच्या घरांत शिरले, अन् पाहतां पाहतां त्यांनीं तिचा सारा संसार उध्वस्त करून टाकला ! सामानसुमान, कापड–चोपड, चीच–वस्त, सारं कांहीं उचलून ते रस्त्यावर फेकूं लागले. भिकारणीच्या तादुळाचं दरिद्री मडकं रस्त्यावरच्या दगडाशेजारीं दांत विचकून पडून राहिलं ! आज–आजसुद्धां तो प्रकार आठवला कीं माझ्या डोळ्यांत पाणी येतं ! "

मी कांहींच बोललों नाहीं.

थोड्या वेळानंतर सोमेश्वर पुढें सांगूं लागले. म्हणाले, " त्या दिवशीं, भर दुपारच्या उन्हाचे चटके सोशीत, उपाशीपोटीं ती आई अन् तिची ती मुलगी, भाड्याची गाडी करून कुठें निघून गेल्या, कोण जाणे ! मी खिडकीशींच उभा होतों. त्या दोघी निघून गेल्या, अन् मला वाटायला लागलं, आज माझे अत्यंत जवळचे आप्त मला टाकून निघून गेले ! ज्यांचीं हृदयं दुःखांनीं अन् अपमानांनीं पिचून

गेलीं आहेत, यातना अन् कलंकांनीं हताश होऊन ज्या पाप्यांनीं आपलीं डोकीं रस्त्यावरच्या धुळींत खुपसून घेतलीं आहेत अशांच्याबद्दल माझ्या मनांत एक प्रकारची फार दाट अशी आपलेपणाची भावना वास करते. असाच आहे माझा स्वभाव !"

कांहीं वेळ थांबल्यानंतर सोमेश्वर पुन्हा म्हणाले, "त्या दोघी निघून गेल्या ! पुढें आयुष्यांत त्या कधींच भेटल्या नाहींत मला. भेटण्याची गरज उरली नाहीं, असं असेल कदाचित ! पुढें मी मोठा झाल्यानंतर एकदां त्या दोघी माय-लेकींचा शोध काढीत मी किती तरी दिवस खूप प्रयत्न केले. पण पत्ता कांहीं लागला नाहीं मला त्यांचा !"

"पत्ता लागला असतां तर काय करणार होता तुम्ही त्यांचं ? कशासाठीं शोध चालविला होता तुम्ही त्यांचा ?"

"मनांत फार इच्छा होती, एकदां भेटल्या असत्या त्या, तर त्यांच्यावर झालेल्या अन्यायाचं प्रायश्चित्त घेतलं असतं ! पण तें होऊं शकलं नाहीं ह्या आयुष्यांत !"

मी म्हणालों, "इतकीं वर्षं लोटलीं त्या गोष्टीला ! आतांपर्यंत त्या केव्हांच स्वर्गांत जाऊन दाखल झाल्या असतील !"

"तसं झालं असलं, तर मी परमेश्वराला धन्यवाद देईन !"

मी हुक्क्याची नळी खालीं ठेवली आणि त्या दिवसापुरता मी सोमेश्वरांचा निरोप घेतला. ते व्हिस्कीच्या गुंगींत डोळे मिटून स्वस्थ पडून राहिले. परलोक-चिंतनांत ध्यानस्थ होऊन गढून गेले असावेत ते बहुधा !





आम्ही माणसं, म्हणजे मी झालों, आमचे सोमेश्वर झाले, हीं माणसं; आम्हाला लोक आतां म्हातारे म्हणतात. आम्ही कांहीं आतां चंचल प्रकृतीचे राहिलों नाहीं. चांचल्य आम्हा मंडळींना शोभत नाहीं ह्या वयांत. सुरवातीच्या तरुण वयांत माणसाचं वर्तन अन् चारित्र्य तऱ्हे-तऱ्हेच्या अलंकारांनीं अन् आभरणांनीं मंडित झालेलं असतं; पण जीवनाच्या सायंकाळच्या छाया जसजशा दाट व्हायला लागतात, अन् शेवटचे दिवस जसजसे जवळ जवळ येऊं लागतात, तसतशीं हीं एक एक विभूषणं गळून पडूं लागतात, आणि मग माणसाचं खरं खरं व्यक्तित्व स्पष्टपणें उमटून येऊं लागतं. आतां ह्या वयांत, जीवनाच्या आकृतीवर निरनिराळ्या रंगांचे फरकाटे ओढून आम्ही नसता मोह उत्पन्न करूं इच्छित नाहीं. स्वतःलाहि नसत्या काल्पनिक माया-जाळांत गुंतवायला नको, अन् दुसऱ्यांचीहि दिशाभूल करायचा नसता उपद्व्याप नको, अशीच बनते आमच्यासारख्यांची मनोवृत्ति! गीता पाठ करण्यांत दिवस घालवितों आम्ही! होईल तितक्या सहजभावानें अन् सरळ गतीनें एकदां डोळे मिटून देवाजीच्या घरची वाट धरली कीं मिळवलं! तोच असतो आमचा प्रयत्न ह्या वयांत!

आमचं ह्या जगांतलं वास्तव्य आतां संपत आलेलं आहे. आयुष्या-बरोबरच आमचं जीवन देखील आतां संकुचित होऊन गेलेलं आहे. त्यांत आतां विस्तार उरला नाहीं, व्यापकताहि उरली नाहीं. माण-साचं हें असंच होतं पहा. कोणीसं म्हटलं आहे ना? जगण्यासारखं जोंपर्यंत कांहीं जवळ आहे, तोंपर्यंतच जगण्यांत मौज आहे! अगदीं खरं आहे तें! आयुष्यांतलं माणसाचं कार्य संपलं, म्हणजे मग तो जगायला अयोग्यच! सोमेश्वर काय, मी काय, आमच्यासारखीं

माणसं ह्या जगांत एका तऱ्हेनें अगदीं निकामीं, अडगळीसारखींच ! जगण्यासारखं आमच्याजवळ आतां काय उरलं आहे ? असंच रखडत खुरडत जगत बसण्यापेक्षां, लवकर एकदांचे डोळे मिटले, तर कांहीं वाईट नाहीं; पण मरण कांहीं माणसाच्या हातचं नाहीं. स्वेच्छेनें आम्ही जन्माला आलों नाहीं, त्याचप्रमाणें मनांत येईल तेव्हां स्वेच्छेनें मरणाला कवटाळूं म्हटलं तर तेंहि शक्य नाहीं. त्या परम शक्तीच्या हातांतलीं खेळणीं होऊन बसलों आहोंत, जगतों आहोंत झालं, जितके दिवस जगायचं लिहिलं असेल नशिबांत तितके दिवस, दुसरं काय ? प्रकाश अन् अंधःकार ह्या दोहोंच्या मधल्या संधि-काळांत जीवनाचे उडते क्षण मोजीत बसलों आहोंत आपले, झालं ! नदीच्या ऐलतीरावर आम्ही येऊन पोहोंचलों आहोंत, आतां पैल-तीराकडे डोळे लागले आहेत आमचे !

मी आपल्या खोलींत बसलों होतों. खिडकींतून पलीकडं शून्य आकाशाकडे दृष्टि लागलेली होती. दृष्टीपुढेंहि सारें शून्य, आंत मनांतहि सारें शून्यच ! कामधंदा, उद्योग असा कांहीं नव्हताच. कांहींतरी करायला पाहिजे, ही जबाबदारी आतां सोमेश्वराच्या अन् माझ्या बाबतींत संपलेली होती. नुसतंच बसून वेळ काढायचा, हेंच आतां आमचें काम !

अशांतच माझी पत्नी खोलींत आली. म्हातारपणीं पति-पत्नींचा संबंध मोठा गमतीचा होऊन बसतो. आतां माझ्या पाठोपाठ धांवपळ करण्यासाठीं तीहि धडपडत नाहीं अन् तिच्यासाठीं माझ्या उरांतहि धडफड, फडधड होत नाहीं. दोन्ही बाजूंनीं उच्छृंखल खळखळाट आतां शांत झालेला आहे. फार काय, पण एकमेकांच्या तोंडाकडे डोळेभरून पाहणंहि आमचं आतां थांबलं आहे. मुद्रेवर किंवा दृष्टींत पूर्व काळच्या चपलतेची चंचल छाया पुसटपणें जरी कधीं उमटून गेली तर आतां आम्हालाच त्याची लाज वाटायला लागते. दोघांचेहि चेहरे एकमेकांच्या बाबतींत फार जुन्या परिचयाचे, पक्क्या ओळखीचे बनून

गेले आहेत. तिच्या तोंडावर कुठें, किती, कशा वळचा आहेत त्या देखील अगदीं मला तोंडपाठ झाल्या आहेत. तिच्या संपूर्ण देहावर, ठिकठिकाणीं रोज रोज, महाकालाचीं उमटतीं चरण--चिन्हं मी उघड्या डोळ्यांनीं पाहत आलों आहें. नवी नवलाई जुनी पुराणी होऊन गेली आहे आतां माझ्यासारखीच.

ती आली, अन् तोंडांतला विडा चघळीत म्हणाली, "ऐकलं का?"

" काय आज्ञा आहे, सरकार ? " मी थट्टेनें म्हणालों.

" इश्श !" आपल्या स्थूल देहाचा एक विचित्र अंगक्षेप करीत ती म्हणाली.

" इश्श काय ? काय झालं ' इश्श ' करायला तुम्हाला ?"

" नाहीं तर काय ? आतां ह्या वयांत ही असली थट्टा करणं शोभतं वाटतं ?"

" अहो, थट्टेला का कुठें वयाच्या अन् काळाच्या मर्यादा असतात ? "

" तुमचं आपलं कांहीं तरीच ! आतां बरोबरीचीं मुलं झालीं. सुनालेकींनीं अन् नातवंडांनीं गजबजलेलें हें घर. जर कोणाच्या कानीं गेलं असलं बोलणं, तर शेण घालतील ना तोंडांत आपल्या! "

" अं: ! तुमचं आपलं काहीं तरीच. पण तें जाऊं द्या. काय सांगायला आला होता ?"

"मी ढीग सांगेन; पण ऐकायला कोणी तयार असेल तेव्हां ना?"

" अहो, पण काय सांगत होतां कळू तरी द्या. "

" आपले मधले चिरंजीव ! परीक्षा द्यायला गेला होता ना ? तो पास झाला. नुकतीच तार आली आहे. "

" असं ?"

तिला वाटला होता तसा आनंद माझ्या मुद्रेवर तिला दिसला नसावा. ती किंचित् रुष्ट होऊन म्हणाली, " कां ? वाईट वाटलं वाटतं ऐकून ? "

" वाईट काय अन् बरं काय ! ठीकच आहे जें झालं तें, दुसरं काय ? बापाचं नांव बुडवलं बेटयानं, दुसरं काय ? "

"इश्श! काय तरी बोलण्याची तऱ्हा म्हणतें मी. बापाचं नांव बुडवलं म्हणतां कीं नांव काढलं त्यानं ? तुमचं नांव बुडवायला, तुम्हाला जशी कांहीं देवानं बुद्धि दिलीच नव्हती. अहो, तुम्हांला देवानं बुद्धि दिली नसती, तर मला जन्म असा दुःखांत काढावा लागला असता का ? किती सुखांत गेले असते दिवस, जर तुम्हांला देवानं अक्कलशून्य बनवून धाडलं असतं तर. जाऊं द्या तें. आतां काय त्याचं ? पोरगा पास झाला, छान झालं. गंगेंत घोडे न्हाले. आतां पावणेतीनशें पगार सुरू होईल त्याला. "

" पावणे तीनशें दरमहा पगार ! अशी कोणती नोकरी मिळणार आहे त्याला ?"

" बाई, बाई, बाई ! शर्थ झाली आतां तुमच्यापुढें ! अहो, तुमचं घरांत काय चाललं आहे तिकडे लक्ष तरी असतं का कधीं ? ठाऊक नाहीं का तुम्हाला, तो दिल्लीला गेला होता रेल्वे कंपनीच्या नोकरीची कसली तरी परीक्षा द्यायला. इतक्या साऱ्या मुलांमध्यें पहिला आला तो. मी तर म्हणतें, कुळाचं नांव उजळलं पोरानं. "

" हुंऽऽ! " मी म्हणालों, " कुळाचं नांव उजळलं, पण बापाचं नांव बुडवलं, हें कांहीं खोटं नाहीं. "

ह्या वेळेस मात्र तिला खरोखरीच राग आला. ती चिडून म्हणाली, " ही कसली मेली बोलण्याची तऱ्हा, म्हणतें मी ?"

बायकांच्या तोंडीं ' इश्श ', अन् ' मेलं ' हे दोन मोठे विलक्षण शब्द आहेत. वाटेल त्या प्रसंगीं, अन् वाटेल त्या अर्थानें त्या ह्या दोन शब्दांची मनसोक्तपणें पेरणी करीत असतात. अन् मौज अशी कीं त्या शब्दास्त्रांचा प्रभावीपणा अगदीं वाटेल त्या संदर्भांत इष्ट असा परिणाम निर्माण करण्यास कधींच उणें पडूं देत नाहीं. चांगल्या कसलेल्या वक्त्यांच्या लांबलचक व्याख्यानांनींहि जें साधणार नाहीं, तें

ह्या एकाच शब्दाच्या कुशल उपयोगानें स्त्रिया सहज साध्य करून घेतात, हा अनुभव तुम्हालाहि कांहीं नवीन नसेल. एका अर्थानें अगदींच अर्थहीन, पण दुसऱ्या अर्थानें भाषा–पंडितांच्या संपूर्ण अर्थ-वाहकतेला गुंडाळून ठेवूं शकणाऱ्या ह्या दोन शब्दांची करामत कांहीं और आहे ह्यांत शंका नाहीं. आज ती विशेष खुशींत होती; मलाहि वाटलं, करावी थोडी गंमत. म्हटलं, " बोलण्याची तऱ्हा मेली बिली नाहीं. चांगली जिवंतच आहे ती तुमच्या दयेनं; पण खरंच सांगतों, तुमच्या मुलानं हा एवढा थोर पराक्रम गाजविला, उत्तम झालं. आतां कोणत्या गोष्टीची चिंता उरली नाहीं आपल्याला. आतां एकदम गपकन् डोळे मिटण्याचा जरी प्रसंग आला, तरी त्याचं वाईट वाटायला नको. खरं कीं नाहीं ? "

ती म्हणाली, " खरं नि खोटं, डोळे मिटायचे अन् न मिटायचे माणसाच्या का हातची गोष्ट आहे ती ? नशिबांत जें असेल तें झाल्यावांचून का राहाणार आहे ? पण म्हटलं तें कांहीं खोटं नाहीं. आतां देवाजीनं उचलून नेलं, तरी त्याचं दुःख नाहीं. मुलं बाळं आहेत, नातवंडं आहेत, सुना–लेकींनीं घर गजबजलं आहे. इतका सारा सुखाचा प्रपंच देवाच्या दयेनें उभा केला आहे. आतां ह्यानंतर डोळे मिटायचा प्रसंग आला तर त्यांत दुःखी होण्याजोगं काय आहे ? काळजी कशाची ? "

मी खिडकींतून पलीकडे पाहत बसून राहिलों. तिचं तें बोलणं ऐकून नवल वाटत होतं मला. आज हिचं वय प्रौढावस्थेच्याहि पलीकडं गेलं आहे. पण हिच्याच तारुण्यांतले दिवस आठवतात मला. त्या दिवसांत हिला माझा एक दिवसाचा सुद्धां विरह सहन करवत नसे. जर कुठें एक–दोन दिवसांसाठीं सुद्धां हिला सोडून दुसऱ्या गांवीं जाण्याचा प्रसंग आला, तर वेदनेनें हिचें अंतःकरण कासावीस व्हायला लागायचं त्या वेळीं. अशी सती साध्वी, पतिपरायण स्त्री उभ्या जगांत शोधूं जातां सांपडायची नाहीं तुम्हाला. जेव्हां तेव्हां

म्हणायचा, कपाळीचं कुंकू कायम ठेवून अहेवपणें डोळे मिटायला मिळाले म्हणजे झालं. ह्यापेक्षां दुसरं कोणतंच मागणं नाहीं माझं देवापाशीं. ह्याचा अर्थ हाच कीं अगदीं आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यंत माझ्या सहवासाचं सौख्य उपभोगायला मिळावं, हीच तिची एकमेव अभिलाषा होती. ह्यापेक्षां अधिक मोठा सुखाचा अन् भाग्याचा ठेवा जीवनांत दुसरा कोणता असूं शकतो असं तिला वाटतच नव्हतं त्या काळांत.

मी म्हटलं, " चला. आयुष्यांत जें कांहीं मिळायचं तें सारं मिळालं आपल्याला. आतां संसारांत काय उरलं आहे आपल्यासाठीं ? चला, आतां आपण तीर्थयात्रा करायला निघूं. आयुष्याचे उरलेले दिवस कुठें तरी देवाच्या पायाशीं घालवायला मिळाले कीं जन्माचं सार्थक झालं. काय, पसंत आहे का बेत ? "

पण माझें हें बोलणें ऐकतांत ती फणकाऱ्यानं म्हणाली, " तीर्थ-यात्रा करायची एवढी उत्कंठाच लागली असेल तर तुम्ही जा एकटे. माझ्या पोरा-बाळांना टाकून मी कुठें जाऊं आणखी दुसरी-कडे आतां ? "

म्हणजे पहा, आपल्या मुलाबाळांत अन् नातू–नातींच्या गर्दीत ती इतकी गुरफटून गेली आहे, कीं आतां तिला माझ्याबरोबर प्रत्यक्ष स्वर्गांत जरी ' चला ' म्हटलं तरी ती यायला तयार होणार नाहीं ह्या सर्वांना टाकून. मी पुन्हा मुद्दामच विचारलें तिला, " मी एकटाच जाऊं ? तुम्ही नाहीं येणार माझ्याबरोबर ? "

" नाहीं ! नाहीं ! नाहीं ! जायचं असलं तर तुम्ही एकटे खुश्शाल जा हवं तिथें. माझीं सारीं तीर्थं अन् क्षेत्र इथंच, माझ्या पोराबाळांच्या जवळच. त्यांना सोडून आपण कांहीं येणार नाहीं तुमच्या बरोबर ! "

ऐकून कांहीं बरं वाटलं नाहीं मनाला. उलट एक प्रकारचा रागच आला मला तिचा. माझ्यापेक्षां, प्रत्यक्ष नवऱ्यापेक्षाहि हिला आपलीं

पोरं अधिक वाटावीं ना ? आज हिला जें कांहीं आपल्या जीवनाचं सारसर्वस्व वाटत आहे, वैभव वाटत आहे, तें सारं माझ्यामुळेंच ना तिला मिळालं ? अन् असं असूनहि तिनें माझी अशी उपेक्षा करावी ? अवहेलना करावी माझी ? हा माझा अपमान आहे असं वाटल्यावांचून मला राहवलं नाहीं. माझा अभिमान दुखावला गेल्यासारखा झाला, अन् मला थोडीशी चीड आली. एकाद्या तरुण साहित्यिकाच्या कादंबरींतला नायक जसा बोलावा, तशासारखा मी रागाच्या स्वरांत म्हटलं, " माझीं पोरं, माझीं बाळं म्हणून सारखा घोष चालविला आहे तुम्ही ! पण हीं तुमचीं लाडकीं मुलंबाळं आलीं कुठून, तें तर सांगा ! अन् त्यांच्यासाठीं तुम्ही प्रत्यक्ष माझी उपेक्षा करायला तयार होतां ? "

तिच्या अंगाचा एकच जळफळाट झाला हें ऐकून. रागानें डोळे विस्फारून ती म्हणाली, " पुरें पुरें झालं तुमचं ! आतां उगाच भलतं सलतं कांहीं तरी बोलून भांडण उकरून काढूं नका आणखी, सांगतें मी ! अगोदरच मी आपल्या दुःखानें मरतें आहें. पित्तानें डोकं गरगरतं आहे सारखं सकाळपासून. त्यांत ह्यांचं आणखी हें असलं बोलणं ! त्यापेक्षां जा ना आपल्या त्या दारुड्या दोस्ताकडे ! तिथें चांगली गुडगुडी मिळेल ओढायला तुम्हाला, जा. " असें बड-बडत ती खोलीच्या बाहेर जायला लागली. इतक्यांत आमच्या मोठ्या सूनबाईचा धाकटा मुलगा रडत रडत आला अन् तिच्या गळ्यांत जाऊन पडला.

" काय झालं बेटा तुला रडायला ? चल, आपण जाऊं इथून ! असल्या खाष्ट आजोबांचं तोंडसुद्धां पाहूं नकोस तूं. चल आपला माझ्याबरोबर माजघरांत ! " असं म्हणत तिनें त्याला आपल्या कडेवर उचलून घेतलं, अन् आपला जाडजूड भाराक्रान्त देह कसा-तरी ओढीत, रेटीत नेत ती खोलीच्या बाहेर निघून गेली !

मनाला माझ्या कुठेंतरी कांहींतरी खुपायला लागल्यासारखं वाटूं लागलं. मला वाटायला लागलं, ह्या जगांत मला कुठेंच स्थान नाहीं, आश्रय उरला नाहीं, आंत सारं कांहीं जसं कांहीं रिकामं होऊन गेल्यासारखं झालं आहे. अन् कां असं वाटायला लागलं, त्याचं कारणहि ठाऊक आहे मला. असा एकाकीपणा वाटायचं कारण हीच माझी पत्नी. देवाब्राह्मणाच्या साक्षीनं जिचा मी स्वीकार केला, माझी धर्मपत्नी म्हणून सारं जग जिला ओळखतं, माझ्यावांचून जिचा दिवस जाणं कठीण, त्याच माझ्या पत्नीनं माझ्याशीं विश्वासघात केला आहे आज, ह्याची मला खात्री पटली आहे. हिच्यावर मी इतका विश्वास टाकला, सर्वस्वी हिच्याच भरंवशावर राहिलों, हें कांहीं बरं केलं नाहीं मी. मोठी चूक झाली ही. एकामागून एक पोरांना जन्म दिला हिनें, अन् आतां त्यांच्यापुढें ही मलाच मोजेनाशी झाली. आपलं काम हिनें काढून घेतलं, अन् आतां, प्रेम प्रीति, प्रणय वगैरे साऱ्या अनुभूतींना आतां तिनें वात्सल्यांत अन् मायाममतेंत बदलून टाकलं आहे, अन् मला आपल्यांतून बाहेर काढून दिलं. आपली गरज भागली, आतां हिला माझा काय उपयोग ? आतां तिला तिचीं पोरं अन् नातवंडं माझ्यापेक्षा अधिक भारी किंमतीचीं वाटायला लागलीं. मी झालों आतां म्हातारा. माझी आतां तिला काय गरज ? स्त्रियांची जातच सदा तारुण्याची उपासक. नवीन जिव्हाळा, नवीन शक्ति, नवं तेज, ह्यांच्याच पुढें त्या सदासर्वकाळ आपलं डोकं लववीत असतात. एकाद्या तरुणीनें कधीं एकाद्या म्हाताऱ्याबद्दल आसक्ति बाळगली आहे, असं निदान मी तरी कधीं ऐकलं नाहीं आजपर्यंत ! ह्याविरुद्ध चांगल्या प्रौढ स्त्रियाहि त्यांच्यापेक्षां वयानें कमी अशा तरुणांच्या मोहपाशांत बांधिल्या गेल्याच्या गोष्टी मात्र पुष्कळशा माझ्या दप्तरीं दाखल आहेत ! स्त्रियांची जातच ही अशी ! अन् ह्यांचा आम्ही पुरुषांनीं विश्वास धरायचा !

माझ्या जिवाचा जळफळाट झाला. आंतल्या आंत मनानें बंडाळी पुकारली, अन् एकच आक्रोश सुरू केला. कांहीं वेळपर्यंत तसाच तळमळत बसून राहिलों, अन् शेवटीं मन ऐकेना तेव्हां उठलों झालं. विचार केला होता, एकदां भगवद्गीतेचीं पानं चाळीन म्हणून. पण कसली गीता, अन् कसलं काय ? जाऊं द्या झालं, म्हणून उठलों, कोपऱ्यांतली काठी हातांत घेतली अन् पायांत जोडा घालून घराच्या बाहेर पडलों. एक प्रकारचं वैराग्यच संचारलं होतं मनांत त्या वेळीं. वाटायला लागलं, ह्या नसत्या जंजाळांत पडलों, त्यापेक्षां तरुणपणींच संन्यास घेऊन टाकला असता तर तें फार बरं झालं असतं.

बाहेर आलों, तों नातू अंगणांत धुळींत खेळत होता. मला पाहून तो धांवत आला, अन् माझी कांठी हातांत पकडून म्हणायला लागला, " आदोबा, तुमी कुथे चाल्ला हो ? "

मनांतून तर असा राग आला होता, कीं द्यावी त्याच्या एक थोबाडींत भडकावून, अन् हात धरून फेकून द्यावं पलीकडे कोपऱ्यांत. पण तें कांहीं झालं नाहीं माझ्याकडून. माझा हात आपला गेला अन् त्याच्या डोक्यावरून फिरूं लागला. पण अंतःकरण जळफळत होतंच. काठी त्याच्या हातांतून काढून घेत मी गुरगुरत म्हणालों, " जातों चुलींत, जातों आहें मी दारू प्यायला " अन् असें पुटपुटत मी बाहेर निघून आलों. माझ्या शब्दांचा अर्थ त्याला काय कळणार ? तो आपला पुन्हा धुळींत फतकल मारून लागला खेळायला !

मी रस्त्यावर आलों, अन् मग माझं मन थोडंसं शांत झालं. आतां ह्या म्हाताऱ्या वयांत रागाचा आवेशहि फारसा टिकत नाहीं माझा. राग आला म्हणजे फार येतो हें खरं; अंग थरथर कापायला लागतं त्या वेळीं माझं. पण त्याचं अस्तित्व असतं थोडा काळच. मी आजच्या ह्या गोष्टीबद्दल चालतां चालतां मनाशीं विचार करूं लागलों, मला एवढा राग येण्याजोगं झालं काय असं ? अन् मग मलाच त्याचं उत्तर सुचलं. माझ्या ह्या रागाच्या मुळाशीं एकच गोष्ट आहे, ती म्हणजे

माझी माझ्या पत्नीबद्दलची आसक्ति. हो ! आसक्तीच नाहीं तर काय दुसरं ?त्याशिवाय का माझ्या मनांत अशा प्रकारची ईर्षा उत्पन्न झाली होतो ? खरोखरीच मी म्हणजे पराकाष्ठेचा ईर्षापरायण ; आपल्या पत्नीवर नवरेपणाचा पुरा पुरा हक्क गाजवूं इच्छिणारा माणूस आहें, म्हणूनच आज मला इतका राग आला होता ! स्वतःच्या मुलांच्या अन् नातवांच्या, मुलींच्या अन् नातींच्या संबंधांतहि माझ्या मनांत, अनदीं सूक्ष्म स्वरूपांत का होईना, एक प्रकारची चढाओढच चाललेली असते, हें अगदीं खरं आहे. माझ्या पत्नीच्या हृदयांत एक मला सोडून दुसऱ्या कोणाला स्थान मिळालेलं आहे, ही गोष्ट मला सहन होत नाहीं. तसं कांहीं पाहिलं, कीं मन चेकाळतं, अन् अंतःकरणांत राग अन् तिरस्काराचे भाव डोकं वर काढायला लागतात. आज जशी माझ्या मनाची अवस्था आहे, तशीच जर माझ्या तरुणपणांत असती ना, तर परिणाम फारच विपरीत झाला असता ! ईर्षेच्या भडकत्या ज्वालेंत होरपळून मी कदाचित् विष खाऊन आत्महत्या केली असती, किंवा साऱ्या जगावर सूड उगवायला निघालों असतों; पण आतां, ह्या उतार वयांत तें तसं करून चालायचं नाहीं ! कोणाला ठाऊक, जर ह्या वयांत जीव बीव देण्याच्या भानगडींत पडलों, तर वाईट वाटण्याऐवजीं साऱ्यांना आनंदच व्हायचा त्यामुळें ! म्हणायला लागायचे, बरं झालं, थेरडा गेला ! पीडा गेली एक !

मी मेलों, तर त्यामुळें कुणाचं कांहीं नुकसान होणार नाहीं, हा विचार मनांत आला, म्हणजे मन अधिकच बेचैन होऊन जातं माझं अन् मग, आपण मरायचं नाहीं, जिवंतच राहाण्यासाठीं धडपड करीत रहायचं, असा मी मनाशीं पक्का निश्चय ठरवून टाकतों ! त्यामुळेंच कीं काय न जाणें, पण जिवाला धोका होऊं नयें, म्हणून मी अगदीं पदोपदीं डोळ्यांत तेल घालून जपत असतों सारखा ! पायांत कुठें एवढासा कांटासुद्धां कधीं बोचूं नयें माझ्या, असाच

माझा एकसारखा प्रयत्न असतो. रस्त्यानें चालतांना मागें पुढें, गाडी घोडा वगैरे नीट पाहून मग पाय उचलीत असतों मी. मृत्युची मला भीति वाटते असंहि म्हणा हवं तर. ह्या एवढ्या बाबतींत मात्र सोमेश्वरांचं निराळं आहे. त्यांना मरणाची भीति कशी ती मुळीं वाटतच नाहीं. त्यांची बायको वारली, अन् तेव्हांपासून त्यांचं आयुष्य कसं शांत, गंभीरपणानं चाललं आहे आपलं ! तेथें नाहीं कशाची भूक, कीं नाहीं कोणत्याहि प्रकारचा क्षोभ ! तऱ्हेतऱ्हेनें अन् सर्व दिशांनीं त्यांनीं जीवन उपभोगलेलं आहे ना म्हणून !

वार्धक्य ही माणसाची अशी एक अवस्था असते, कीं जी आली म्हणजे माणसाला सहजासहजीं सोबती मिळत नाहींत आयुष्यांत. फार एकटं एकटं जीवन असतं हें अन् म्हणूनच अत्यंत कंटाळवाणंहि. जुने सोबतीसुद्धां दूर जाऊन पडतात; मग नवीन येऊन जुळायचे तर दुरापास्तच. माणसाचें वयच ह्या बाबतींत फार मोठी अडचण होऊन बसतं. युवावस्थेंत जशीं काहीं दारं नेहमीं उघडीं असतात. किती त्या काळांत येणारे-जाणारे, किती ओळखी-पाळखी. तऱ्हे-तऱ्हेच्या स्वभावाचीं माणसं हर तऱ्हेच्या रसांचे कलश घेऊन तुमच्या दाराशीं जणूं काय सज्ज होऊन ठाकलेले असतात म्हणायला, या अन् घ्या ह्या रसाचा मनसोक्त आस्वाद. त्या वयांत हव्या त्याचा स्वीकार करायला संकोच वाटत नाहीं, कीं नको त्याला अव्हेरून दूर लोटण्यांतहि माणूस मागें पुढें पहात नाहीं. पण प्रौढावस्थेंत माण-साला असा उद्दामपणा करून चालत नाहीं. त्याला सर्वच गोष्टींचा विचार करावा लागतो. आपलं नांव आहे, इभ्रत आहे, मान-सन्मा-नाची कल्पना आहे, अभिरुचि अन् गांभीर्य आहे ! ह्या वयांत मनसोक्तपणें, उच्छृंखलपणें वागायला मुभा असते थोडीच ? वार्ध-क्याच्या आवती भोंवती एक प्रकारच्या दुःसह, उदासवाण्या आनंद-हीनतेचं आळं पडून जातं. त्या वर्तुळाच्या गंभीर परिसीमेच्या आंत पाऊल ठेवायचीहि माणसाला भीति वाटते, अन् म्हणूनच त्या

आवर्तांत सांपडलेल्या वृद्धांना त्याच्या बाहेर पाऊल ठेवायचाहि संकोच वाटतो. पण कांहीं असलं तरी, त्या परिघरेषेच्या आंत मृत्यूचं जाळं मात्र सदा सर्वकाळ विणलं जात असतं एकसारखं. ह्या वर्तुळांतलं आकाश धूसर झालेलं, वातावरण भाराक्रान्त झालेलं, कांहींसा प्रकाश अन् कांहींसा काळोख ह्यांच्या संमिश्रणानं तयार झालेलं, छाती दडपून टाकणारं दुःखदायक बनलेलं असं तें वातावरण. त्याच संधिकाळांत मीहि आज आलों आहें! म्हणून तर माझ्या जीवाची ही अशी परवड!

घरीं तो तसा प्रकार झाला, आणि म्हणून मी कुठें तरी जायचं ठरवून बाहेर पडलों. पण जाऊन जाऊन जाणार कुठें मी? सरड्याची धांव कुंपणापर्यंत; तशीच माझीहि धांव येऊन जाऊन सोमेश्वराच्या वाड्यापर्यंतच! गेलों, अन् त्यांच्या दिवाणखान्यांतल्या आपल्या नेहमींच्या जागीं जाऊन बसलों झालं! अजून संध्याकाळ व्हायला बराच अवकाश होता. रोजच्या मानानें मी आज कितीतरी लौकर येऊन बसलों होतों वाड्यांत. पण ही एक जागा सोडली, तर दुसरीकडे कुठें होता मला थारा? एक हा मदिराभक्त, माझ्याप्रमाणेंच म्हातारा गृहस्थ सोडला, तर उभ्या जगांत मला दुसरा कोणी सोबती नव्हता आतां. त्याच्याजवळ जाऊन बसलं कीं त्यांची आपली टकळी सुरू व्हायची. त्यांच्या आयुष्यांतल्या तऱ्हेतऱ्हेच्या अन् तऱ्हेवाईक गोष्टी ऐकतां ऐकतां माझा जीव बेजार झाला होता अगदीं! माझ्या हातांत हुक्क्याची नळी धरून ठेवायला लावून त्या नळीनें हा सद्गृहस्थ मला बांधून ठेवी, अन् स्वतः व्हिस्कीचे घोट घेत आपल्या उच्छृंखल जीवनातल्या साऱ्या निर्बुद्धतेच्या गोष्टी एक एक करून सांगत सुटे! अन् दिवसामागून दिवस मला त्याच साऱ्या गोष्टी ऐकत बसणं भाग पडायचं! गतिहीन स्थविरत्व हेंच वार्धक्याचं खरं खरं लक्षण आहे. ज्याची दृष्टि भावी कार्याकडे वळत नाहीं, अतीत जीवनाकडेच जो तोंड वळवून बसलेला असतो, असा

माणूस जिवंत असला तरी तो खरोखरी मेला असंच म्हटलं पाहिजे. ह्या असल्या गतिहीन, निरानंद जीवनाबद्दल मधून मधून इतका विलक्षण उबग आल्यासारखं होतं, कीं कांहीं विचारूं नका. वाटतं, ह्या वार्धक्याचं हंसं उडवून, त्याची थट्टा करून, हुसकावून लावावं बेटयाला ! स्थविरत्वाच्या ह्या आनंदहीन वातावरणाला हास्याच्या कल्लोळांत बुडवून टाकावं, खळखळणाऱ्या उल्हासाच्या फूत्कारांनीं त्याला कुठच्या कुठें उडवून लावावं !

मी दिवाणखान्यांत पाय ठेवला आणि आपल्या जागेवर जाऊन बसावं म्हटलं, इतक्यांत सोमेश्वर अन् त्याच्याबरोबर एक तरुण स्त्री असे दोघेजण आंतल्या खोलींतून बाहेर आले.

मला समोर पाहिलं, तशी ती तरुणी हंसून म्हणाली, "अरे वा ! हे पहा, काका देखील आलेच कीं !" इतकें बोलून ती चटकन् पुढें आली, अन् माझ्यापुढें वांकून तिनें मला नमस्कार केला. मी तिला एकदम ओळखलं. सांत्वना होती ती. मी म्हणालों, "खुशाल रहा ! काय ग सांत्वना, बरी खुशाल आहेस ना ? अन् काय ग, तुझ्या नवऱ्याची प्रकृति कशी आहे आतां ?"

"होती तशीच आहे काका ! कांहीं फरक नाहीं अजून !" सांत्वना म्हणाली. त्यानंतर ती सोमेश्वराकडे वळून म्हणाली, "जर आलांत ना मोठे काका, तर दोघेजण मिळूनच या तुम्ही. याल ना ? मग मी तोंपर्यंत पुढें होतें."

"येऊं बरं बाळ ! आम्ही दोघेहि येऊं" असें म्हणत सोमेश्वरांनीं आरामखुर्चीवर आपला देह लोटून दिला. आनंदानें तोंडभर हंसत, उल्हासयुक्त मुद्रेनें सांत्वना निघून गेली.

नोकरानें हुक्का तयार करून पुढें आणून ठेवला. कांहीं वेळपर्यंत आम्ही दोघेहि कांहीं न बोलतां गुपचुप बसून होतों. त्यानंतर सोमेश्वर म्हणाले, "ह्या पोरीची तुमची साधारणच ओळख

आहे. मला वाटतं, तसा कांहीं विशेष असा संबंध आला नसावा तुमचा तिच्याशीं, खरं ना ?"

मी उत्तर दिलें, "खरं आहे. माझी तिची नुसती तोंडओळख आहे, ह्यापलीकडे कांहीं नाहीं. केव्हां मी तिचा काका बनून बसलों, तें कांहीं ठाऊक नाहीं मला. पण, मला वाटतं, पोरींच्या जातीचं हें असंच असतं. सरळ सरळ नातं जुळवून घेतल्यावांचून त्यांना मला वाटतं, बरंच वाटत नाहीं."

सोमेश्वर म्हणाले, "हं ऽ! ती आली होती आमच्या थोरल्या सूनबाईकडे. त्यांची ती मैत्रीण आहे ना, म्हणून आली होती भेटायला त्यांना. तुम्हाला तर ठाऊक आहे आमच्या सूनबाईचा स्वभाव ! त्यांच्या स्वभावात अहंपणाचा दंभ कांहींसा जास्तच आहे. मोठ्या घरची सून पडली ना ती म्हणून ! सांत्वना तिची पुष्कळ वर्षा-पासूनच्या ओळखीची, तिची मैत्रिणच आहे, हें खरं. पण आमच्या सूनबाईचं तिच्याशीं वागणं अगदीं मैत्रिणीच्या नात्याचंच असतं, असं कांहीं म्हणतां येत नाहीं. आपण मोठे, ती गरीब, असा कांहीं तरी भाव तिच्या मनांत राहतोच."

"आली होती कशासाठीं सांत्वना ?"

"काय करणार ? गरीबीनं गांजली आहे बिचारी ! कुठल्याशा शाळेंत मास्तरीण आहे; पण तेवढ्यांत कांहीं भागत नाहीं तेव्हां उरल्या वेळांत इकडचे तिकडचे कोणाच्या तरी घरचे मुला-बाळांचे चार कपडे शिवून कांहीं थोडी फार जास्तीची कमाई करण्याच्या खटपटींत असते ती. आमच्या थोरल्या सूनबाईच्याकडेहि येत असते ती अधून-मधून त्यांच्याकडूनही कांहीं काम मिळवायला. आमच्या सूनबाई म्हणजे थोरा-मोठ्यांच्या घरांतल्या पडल्या ना ! पोलकीं, ब्लाऊझ अन् अशाच हजार गोष्टी त्यांच्या मागें लागलेल्याच अस-तात रात्रंदिवस ! त्याशिवाय आणखीहि इतर भानगडी काय थोड्या असतात म्हणतां ? त्यामुळें सांत्वनासारख्या दरिद्री माणसांबरोबर

बोलायला, त्याच्याकडें पहायलाहि त्यांना नेहमीं वेळ मिळतोच असं नाहीं!"

सोमेश्वरांना राग आलेला होता, हें स्पष्टच दिसत होतं. मी म्हणालों, "हं! पण थोरामोठ्यांच्या घरांतली सून होणं कांहीं अपराध नाहीं तिचा, सोमेश्वर. त्याशिवाय, रात्रंदिवस दुसऱ्याची काळजी करीतच बसलं पाहिजे त्यांनीं, अशी तरी जबरदस्ती काय म्हणून? मोठ्या घरच्या सुना-लेकींना दुसरींहि मोठीं कामं असूं शकतातच ना! तीं सारीं टाकून त्यांनीं दुसऱ्यांच्याबद्दल काळजी वाहत बसावं, हा तरी जुलूम काय म्हणून?"

इतकं बोलून मी थांबलों. बोललों तेवढं पुरं झालं. ह्यापेक्षां अधिक युक्तिवाद अन् तर्कवितर्क करीत बसायला माझ्याजवळ तरी कुठें एवढा उत्साह होता? म्हातारपण आलं आहे ना! म्हणून आमचा युक्तिवाद असा थोडक्यांतच संपुष्टांत येतो.

सोमेश्वर म्हणाले,"ती आली होती पैशासाठीं. तिचा नवरा सारखा अंथरुणाला खिळलेला आहे, ठाऊकच आहे तुम्हाला. आजारपणापायीं खर्चंहि अव्वाच्या सव्वा होऊन जातो. त्यामुळें तिची खरोखरीच पंचाईत झाली आहे बिचारीची. आज तिला कांहीं पैसे द्यायचे सूनबाईनीं कबूलहि केलं होतं, अन् म्हणूनच सांत्वना तिच्याकडे आली होती. पण आमचे चिरंजीव बाहेरगांवीं गेलेले आहेत. त्यांना पत्र लिहिण्याच्या कामांत सूनबाई आज इतक्या व्यग्र होत्या, कीं त्यांना कांहीं सांत्वनाला पैसे द्यायला फुरसत झाली नाहीं! जमीनदाराची सून पडली ना ती! नवऱ्याला प्रेम-पत्र लिहायला तिला वेळ लागणारच! चला, जाऊं या का आपण सांत्वनाच्या घरीं?"

हुक्क्याची नळी तोंडावेगळी करून मी उठलों अन् म्हणालों, "चला."

मोटार बाहेर काढायला सोमेश्वरांनीं ड्रायव्हरला बोलावलें, तसें मी म्हटलें, "मोटार कशाला हवी सोमेश्वर? गरीबाच्या घरीं

जायचं, तिथें हवी कशाला मोटार अन् गाडी ? पायींच जाऊं या चला. राहूं द्या मोटार. हें जवळच तर घर आहे तिचं."

"ठीक आहे, पायींच जाऊं, चला."

वाड्यासमोरची बाग अन् फाटक ओलांडून आम्ही दोघे रस्त्यावर आलों. आम्हां उभयतांच्या हातांत काठ्या होत्या. काठीच्या आधाराशिवाय ह्या वयांत आम्ही चालूं कसे शकणार ? हिवाळा आतां संपून गेला होता, आणि सुखद, सुमधुर अशा वसंताला आरंभ झाला होता. पण, तरी सुद्धा थंडी बिडी वाजेल कदाचित् अशा भीतीमुळें आम्ही आपादमस्तक गरम कपड्यांनीं स्वतःला आच्छादून घेतलेलं होतं. तशी थंडीची भीति नव्हती. आम्हाला खरी भीति वाटत होती मृत्यूची, हाच ह्याचा खरा अर्थ.

माझ्या आणि सोमेश्वरांच्या जीवनांत आजचा हा दिवस एक निराळाच, विशेष रूप धारण करून आला आहे असं आम्हां दोघांनाहि वाटत होतं. गेल्या अनेक वर्षांपासूनची आमची संवय अगदीं निराळ्या प्रकारची बनलेली होती. माझ्या घरापासून ह्या वाड्यापर्यंत यायचं, इथल्या दिवाणखान्यांत बसून वेळ घालवायचा, अन् परत जायची वेळ आली, कीं पुन्हा आलों तोच मार्ग आक्रमून घरीं परत जायचं ! दिवसामागून दिवस हाच होता आमचा शिरस्ता. त्या कुठल्याशा एका प्राण्याची गोष्ट सांगतात ना ? त्याच्या आयुष्यांत एक विशिष्ट काळ आला कीं तो अंधाऱ्या गव्हारांत जाऊन दडून बसतो. आम्हीहि ह्या म्हातारपणांत दिवाणखान्यांतल्या खोलींत स्वतःला कोंडून घेऊन दिवस कंठित होतों. बाहेरचा प्रकाश, बाहेरची मोकळी हवा ह्या गोष्टीशीं आमचा संबंधच नव्हता उरला जसा कांहीं. पण आज मात्र आमच्या त्या नित्याच्या क्रमांतून आम्ही बाहेर पडलों होतों. किती नवं, निराळं वाटत होतं आम्हाला सारं आज !

रस्त्यानें चालतां चालतां सोमेश्वर सांत्वनेसंबंधींच पुष्कळशा

गोष्टी सांगत जात होते मला. त्या मुलीच्या जीवन-संग्रामाची एक रोमहर्षक कहाणीच आहे आणि ती सांगत असतांना, तिच्याबद्दल सोमेश्वरांचं अंतःकरण सहानुभूतीनें कसं ओथंबून आल्यासारखं झालं होतं,स्वतंत्रतापूर्वक आपलं आयुष्य कंठायचं अन् घडवायचं असा तिचा निश्चय होता, अन् त्याप्रमाणें तिनें आपल्या आयुष्यांत तयारीहि खूप केली. असली दृढ निष्ठा, असा आत्मविश्वास, इतकं विलक्षण धैर्य, चांगल्या 'मी ! मी !' म्हणणाऱ्या पुरुष-माणसाच्या ठिकाणींसुद्धां मिळणं दुरापास्त. मग बायकांच्या जातोची तर गोष्टच सोडा ! पण तें धैर्य ह्या पोरीनं मात्र दाखविलं ! कधींहि आणि कुणापुढेंहि तिनें मान वाकविली नाहीं. एका तरुण गृहस्थावर तिचं मन जडलं ; तिनें त्याच्याशीं लग्न लावून घेतलं ! तो मुलगा नव्हता जातीचा. त्यामुळें घरांतल्या माणसांचा अन् त्याप्रमाणें घराबाहेरच्या माणसांचाहि तिला मनस्वी ताप सहन करावा लागला होता. दुसरं कोणी असतं, तर भीतीनं कंबरडंच मोडलं असतं त्याचं ! पण त्या पोरीची हिंमत खरी ! तिनें कशाचाहि पर्वा केली नाहीं. आपल्या सदसद्-विवेक बुद्धीनें अन् अंतःकरणानें तिला जो मार्ग दाखविला तोच तिनें पत्करला अन् त्या मार्गावरून चालत असतांना येतील त्या अडचणींशीं अन् संकटांशीं अगदीं हंसत हंसत झुंजत राहिली ! अजूनहि तिचं तेंच चालू आहे. इतक्या अडचणी आहेत, पण तोंडावरचं हसूं मात्र कधीं मावळलेलं पाहिलं नाहीं पोरीच्या !

बोलतां बोलतां सोमेश्वर एका अरुंद गल्लींत शिरले आणि एका घरापुढें उभे राहून म्हणाले, " हेंच दिसतं आहे सतरा नंबरचं घर ! आलों आपण ; इथेंच राहाते सांत्वना ! "

अगदीं जुनाट, एकमजलीच घर होतं तें.मी पाहिलं, दारं-खिडक्या साऱ्या आंतून बंद करून घेतलेल्या होत्या. गल्लींतहि मागें--पुढें सारा अंधार पसरलेला होता. संध्याकाळ होऊन गेली होती, अन् दिव्यांचा कुठें पत्ता नव्हता. पण सोमेश्वरांच्या तोंडचे ते शब्द बाहेर पडले,

अन् लगेच घराचं दार उघडलं गेलं. आम्हाला दारावर थाप मारून हांक मारण्याचीहि गरज उरली नाहीं. पाहिलं, तर सांत्वना दारांत उभी ! आम्हांला पाहतांच तिची मुद्रा आनंदानें झळकूं लागली. हंसून ती म्हणाली, " आलांत, फार बरं झालं. या, आंत चला. "

सोमेश्वर म्हणाले, " आलों म्हणजे काय ? येणारच ! आम्ही कबूल नव्हतं का केलं तुला ? पण आम्ही आल्यामुळें तुला कांहीं अडचण, त्रास तर नाहीं ना झाला बाळ ? "

सांत्वना म्हणाली, " इश्श ! त्यांत त्रास कसला ? अडचण कशाची ? तुम्ही आलांत म्हणून मला त्रास ? म्हणजे झालंच ! चला आंत. पहा, तुम्ही येणार म्हणून मी बसायला सुद्धां सतरंजी घालून ठेंवली आहे. मघापासूनच वाट पहात होतें मी. पण संध्याकाळ होऊन गेली. दिवेलागणीची वेळसुद्धां होऊन गेली अन् तरीहि तुम्ही आलां नाहींत हें जेव्हां मी पाहिलं, तेव्हां वाटलं, कोणाला ठाऊक येतात कीं नाहीं ! पण आलांत तुम्ही दोघंहि, फार बरं वाटलं मला. "

मी म्हटलं, " मी देखील म्हणत होतों पुष्कळ दिवसापासून एकदां जावं तुझ्याकडे. कांहीं काम-धंदा नाहीं, उद्योग नाहीं ! त्यामुळें वेळहि भरपूर असतो ; पण आजपर्यंत यायचं जमलं नाहीं हें मात्र खरं ! आज आला तो योग. तोहि सोमेश्वरांमुळें ! नाहीं तर, इच्छा असूनहि, आज तरी यायचं जमलं असतंच कीं नाहीं, कोण जाणे ? ह्या बाबतींत मी सोमेश्वरांपेक्षांहि जास्त अपंग आहें म्हणेनास ! "

" हंऽ ! चालायचंच. " सोमेश्वर म्हणाले. " म्हाताऱ्या माणसाचं हें असंच. "

विषय बदलीत मी म्हणालों, " तुझं कसं काय चाललं आहे सांत्वना ? "

स्निग्ध, मधुर हंसून ती म्हणाली, " बरं चाललं आहे तुमच्या आशीर्वादानें काका ! आला दिवस कांहीं थांबून रहात नाहीं माणसा-

करतां. निभतंच कसंतरी ! आमच्या थोरच्या वहिनींची कृपा आहे माझ्यावर. त्यामुळें भागतं माझं नीटपणें. अडीअडचणीला त्या पहावं तेव्हां माझ्या पाठीशीं उभ्या असतात. माझ्यासाठीं पुष्कळ केलं आहे त्यांनीं आजपर्यंत. खरोखरी, फार उपकार आहेत त्यांचे. "

उपकारांच्या जाणीवेचं रूप हें असंच, करुणापूर्ण आणि कुंठित ! तिची आर्थिक दशा कशी होती, त्याचीहि मला कल्पना होती, आणि तिच्या बाबतींत सोमेश्वरांच्या थोरल्या सूनबाईंचं वर्तन कसं होतं, त्याचंहि वर्णन मी नुकतंच ऐकलेलं होतं आणि असं असूनहि. ह्या पोरीच्या तोंडून हे असे उद्गार बाहेर पडत होते ! माणसाला लाचारीची अगतिकता आली, कीं त्याचं हें असंच होत असावं. मी कांहींच बोललों नाहीं. ती सोमेश्वरांच्या सूनबाईंच्या औदार्याचं तोंड-भरून वर्णन करीत असतांना, मी घरांत इकडे–तिकडे नजर फिर-विली. अति सामान्य, दरिद्री घरांत जसं सामान-सुमान असतं, तसंच इथेंहि होतं. जिथें तिथें जुनेपणा, दैन्य आणि अभाव ! पण ह्यांतूनहि एक गोष्ट मात्र जिथेंतिथें स्पष्टपणें नजरेंत भरत होती. ती म्हणजे स्वच्छता अन् व्यवस्थितपणा ! भांडीं-कुंडीं, चीजवस्त जी कांहीं होती, ती कशी अगदीं निर्मळ, अन् टापटीप तर अगदीं वाखा-णण्याजोगी ! ह्या घरांत जें कांहीं आहे त्या सर्वांच्या मागें मम-तेनं माखलेल्या मनाचा अक्लांत सेवाभाव ठिकठिकाणीं उठून दिसत होता. अगदीं मनोभावानें, जें असेल तेंच शक्य तेवढें आनंददायक, सुखदायक करून सोडण्याची वृत्ति साऱ्या घरांतल्या सुव्यवस्थेंतून जणूं काय मान वर काढून आपलं तोंड जगाला स्पष्टपणें दाखवीत होती. तिथें विलासांची अकारण साज-सजावट नव्हती, कीं आपल्या घमेंडीनें आणि दंभानें पाहणाऱ्याच्या दृष्टीवर जोरानें आघात कर-णारं ऐश्वर्याचं उपकरण-बाहुल्यहि कुठं नव्हतं. तेथें जें कांहीं होतं तें निर्मळ साधेपणाचं त्रिलोभनीय पावित्र्य ! धनसंपन्न, विलासी ऐश्वर्यवन्तांच्या घरांतली सुखसामुग्री न्याहाळून बावरून गेलेल्या,

घाबऱ्या झालेल्या नजरा इथें येऊन विसावल्यासारख्या व्हाव्या, असा होता सांत्वनेचा दरिद्री संसार !

सोमेश्वरांनीं प्रश्न केला, "काय ग, तुझ्या नवऱ्याची प्रकृति कशी आहे आतां ?"

सांत्वना म्हणाली, "पहा ना, ते पहा पडले आहेत अंथरुणाला खिळून ! शरीराचा सापळा उरला आहे नुसता ! अंथरुणाशीं कसे एकजीव झाल्यासारखे होऊन गेले आहेत. आज पांच वर्षं झालीं, हीच अवस्था आहे ! थोडीं थोडकीं नाहीं, पुरीं पांच वर्षं झालीं ह्यांच्या आजाराला. ह्या सबंध काळांत मन सारखं एकाच आशेंत गुंतलेलं आहे–हे आज बरे होतील, उद्यां बरे होतील !"

तिनें दाखविलें त्या दिशेकडे आम्ही दोघांनीं नजरा वळवून पाहिले. पण खोलींत अंधार होता, आणि पलीकडच्या कोपऱ्यांत तर तो विशेषच दाट झालेला होता. त्यामुळें आम्हाला दिसलं कांहींच नाहीं. आम्हाला घरात येऊन इतका वेळ होऊन गेला होता ; पण आम्ही तिघेजण सोडून चौथा कोणी इसम ह्या घरांत किंवा ह्या खोलींत असेल ह्याचा पुसटसुद्धां आभास आम्हाला ह्या क्षणापर्यंत मिळाला नव्हता. ना कोणती हालचाल, ना कण्हणं–कुंथणं, ना कांहींहि. आम्ही स्तब्ध बसून राहिलों.

सांत्वना पुढें सांगू लागली, "सुरुवातीसुरुवातीला ताप लागला होता मागें बरेच दिवसपर्यंत. त्यांतून जेमतेम बरे होऊन कुठें हिंडायला फिरायला लागतात न लागतात, तों अर्धांगवायुनें पछाडलं ! सारं डावं अंग अजीबात कामांतून गेलं अन् पांगळे होऊन पडले इकडे तिकडे जरासुद्धां हालचाल करण्याचीसुद्धां शक्ति राहिली नाहीं अंगांत त्यांच्या. घरच्या नात्या-गोत्याच्या माणसांनीं तर आमचं नांवच टाकलं आहे. आमचं लग्न झालं तें कांहीं त्या मंडळींना पसंत नव्हतं. त्यामुळें, त्यांच्याकडून कांहीं मदत होईल, ही आशाच

खुंटली ! आतां त्यांना एक माझ्याखेरीज उभ्या संसारांत दुसरं कोणी नाहीं ' आपलं ' म्हणायला ! "

सांत्वना पुन्हा किंचित् हंसली. दुपारीं सोमेश्वरांच्या घरीं ती मला भेटली होती. त्या वेळीं तिच्या कपाळावरचं सौभाग्यचिन्ह जें मी पाहिलं होतं तें दिवसाच्या उजेडांत अगदीं स्पष्ट दिसलं होतं मला. तोच कपाळावरचा कुंकवाचा टिळा, आतां ह्या घरांतल्या अस्पष्ट अंधुक उजेडांत अधिकच उज्ज्वल अन् तेजस्वी दिसूं लागला आहे असा माझ्या मनाला भास झाला. वाटायला लागलं, जणूं काय तो टिळा आपल्याच महिमेनें प्रदीप्त होऊन अविकंपित, स्थिर, दैदीप्यमान अग्निशिखेप्रमाणें झळ झळ झळकतो आहे जसा कांहीं !

पुन्हा सांत्वनाच बोलूं लागली. म्हणाली, " आजारी पडले, त्यापूर्वीं चांगला रोजगार धंदा करीत असत. उत्पन्नहि बरं होत असे. त्यामुळें आमचं लग्न झाल्यानंतर कांहीं दिवस सुखांत गेले आमचे. पण मग पुढें ही अवस्था झाली. तेव्हांपासून मात्र दिवस फिरले आमचे. दुसरा कोणताच आधार नव्हता. काय करायचं ? त्यांतूनहि आजारी माणूस म्हटलं कीं, औषधपाण्याची खटपट तर शक्य तेवढी करायलाच पाहिजे ना ? मध्यंतरीं एकदां मी कसं तरी करून मोठ्या दवाखान्यांत घेऊन सुद्धां गेलें होतें त्यांना. म्हटलं मोठ्या डॉक्टरकडून कांहीं झालं तर पाहावं. पण नुसती नेण्या-आणण्याची दगदग अन् यातायातच काय ती पदरांत पडली. रोग दूर होण्याचा उपाय कांहींच होऊं शकला नाहीं.डॉक्टरांनीं सांगून टाकलं, म्हणाले, हा रोग सहजासहजीं बरा होणारा नाहीं !"

शेवटीं हिय्या करून मी म्हणालोंच, " पण हें असं तुमचं चालणार किती दिवसपर्यंत ? "

" तेंच तर माझ्याहि मनाला डांचत आहे सारखं, काका ! पण काय करायचं तुम्हीच सांगा. मला जें कांहीं करतां येणं शक्य होतं तें सारं कांहीं मीं केलं. पांच वर्षं तर निघून गेलींच. आणखी

पांच वर्षांनीं का होईना, पण जर ते आजारांतून बरे होऊन नेहमीं-सारखे हिंडायला फिरायला लागले तर पहायचं ! मला दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीची चिंता नाहीं- कशाचंहि कांहीं वाटत नाहीं. फक्त एकच इच्छा आहे, अन् त्यासाठींच माझी सारी धडपडहि चाललेली आहे. कसं तरी करून ह्यांना पुन्हा एकदां पूर्वींसारखं झालेलं पहावं ! बस्स ! ह्याशिवाय मला दुसरं कांहींहि नको. जोंपर्यंत माझा हात-पाय चालतो आहे, तोंपर्यंत माझी सारी शक्ति, माझं सारं सामर्थ्य एकवटून मी दिवसभर शाळेंत नोकरी करतें. त्यानंतर एक शिकवणीहि धरली आहे अन् रात्रीच्या वेळीं, तें पहा तें सिंगरचं मशीन आहेच ठेवलेलं तिथें. रात्रीच्या वेळांत इकडचं तिकडचं शिवण–बिवण करीत असतें. पण आजकालचा दिवसमान हा असा चमत्कारिक झाला आहे. इतकं करूनहि पुरं पडत नाहीं. शिवणांतहि आजकाल मिळावं तितकं काम मिळत नाहीं. नाहींतर मी तर रात्र रात्र जागून आनंदानें केलं असतं सारं. अहो, चार पैसे मिळवतां आले तर तेवढेच औषधपाण्याला कामीं नाहीं का येणार ? पण काय करायचं ? आपल्या हातची गोष्ट आहे थोडीच ? ”

बराच वेळपावेतों आम्ही तिघेहि स्तब्ध बसून राहिलों. बोलण्या-सारखं विशेष कांहीं नव्हतंच. साऱ्याच गोष्टी इतक्या स्पष्ट अन् उघड होत्या कीं त्याबद्दल प्रश्न तरी काय करायचा अन् उत्तर तरी कसचं मिळायचं ? एकानें सांगून दुसऱ्यानें समजून घेण्याची ही गोष्टच नव्हती. ही तर प्रत्यक्षच अनुभवून घेण्याची गोष्ट होती ! त्यांत बोलायचं काय ?

शेजारींच कोंपऱ्यांत पडलेल्या अंथरुणाकडे पाहून सांत्वना हंसून म्हणाली, “ आजकाल तर ह्यांनीं माझ्याशीं बोलणंच टाकल्यासारखं केलं आहे. सारखा वर्षानुवर्षं आजार लागला आहे ना पाठीशीं' त्यामुळें शरीराप्रमाणेंच मनसुद्धां खिळखिळं होऊन गेल्यासारखं झालं

आहे त्यांचं." बोलतां बोलतां मध्येंच ती पुन्हा हंसली आणि म्हणाली, "मध्यंतरीं तर एकदां डोकंच फिरल्यासारखं करूं लागले होते ! माणसाचं होतं असं कधीं कधीं ! लहान मूल नाहीं का कधीं कधीं चिडून जाऊन आईलाच मारझोड करायला लागत ? तसंच...."

ह्या खेपेला सोमेश्वरांनीं खालीं लावलेली आपली दृष्टि वर उचलली. त्यांनीं एकदां सांत्वनेकडे पाहिलं, अन् मग म्हणाले, "त्याच्याच ह्या खुणा उमटलेल्या आहेत वाटतं तुझ्या हातां-तोंडांवर ?"

सांत्वना म्हणाली, "त्यांत त्यांचा काय दोष ? माणसाचं मन थाऱ्यावर नसतांना त्याच्या हातून जर कांहीं घडलं, तर त्याबद्दल त्याला दोषी का ठरवायचं ?"

इतक्यांत तिकडे अंथरुणांत कांहीं तरी हालचाल झाल्यासारखं वाटलं. त्याबरोबर सांत्वना उठली अन् घाईघाईनें तिकडे गेली. अस्पष्ट, अंधुक उजेडांत अंथरुणावर ओणवून ती अत्यंत ममतापूर्ण स्वरांत विचारूं लागली, "ही पहा, मी आहें इथें, इथेंच आहें, अगदीं जवळ. काय हवंय् तुम्हाला ? कांहीं सांगायचं आहे ?"

तिचा आजारी नवरा निजलेला होता, त्या जागेपासून आम्ही बऱ्याच अंतरावर बसलों होतों. शिवाय इतक्या दीर्घ काळच्या आजारामुळें त्याची शक्तीहि अगदीं क्षीण झालेली होती. पण तरीहि सांत्वनेच्या प्रश्नाला उत्तर देतांना त्यानें आपल्या फाटक्या आवाजांत जे काहीं उद्‌गार काढले ते आमच्या कानांपर्यंत अगदीं स्पष्टपणें येऊन थडकले ! इतक्या प्रेमळपणानें बायकोनें केलेली विचारपूस, आणि त्याबद्दल नवऱ्याकडून कारण नसतांना उच्चारले गेलेले ते अत्यंत कटू शब्द ऐकून वाईट वाटलं आम्हाला, आणि वाईट वाटलं त्यापेक्षांहि अधिक आश्चर्यहि वाटलं ! गोष्ट आमच्या जीवाला जाऊन बोंचलीच अगदीं ! पण सांत्वनेला त्याचं कांहीं वाटल्यासारखं दिसलं नाहीं. निदान तिनें कांहीं दाखविलं तरी नाहीं वाटल्याचं आम्हाला. नवऱ्याचं तें बोलणं ऐकून ती त्याच्याजवळून उठली अन्

हंसतमुखानें आमच्याकडे येऊन म्हणाली, " पुष्कळ वेळ झाला, कांहीं खाल्लेलं नाहीं, त्यामुळें असे चिडल्यासारखे झाले आहेत, दुसरं कांहीं नाहीं !"

" हो, हो ! भूक लागली म्हणजे चिडचिड करतोच माणूस ! त्यांतून ते पडले आजारी ! जा बाळ, तूं त्यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था पहा. आम्ही जातों आतां; येऊं पुन्हा ! " असें म्हणत सोमेश्वर उठले.

सांत्वना माझ्याकडें वळून म्हणाली, " अन् तुम्ही पण यायचं बरं का काका, यांच्याबरोबर ! तुम्ही दोघे आलांत कधीं-मधीं तर फार बरं वाटतं बघा ! याल ना ? "

" येईन कीं ! अगदीं अवश्य येईन मी ! " असें म्हणत म्हणत मी सोमेश्वराबरोबर दाराच्या बाहेर पडलों, अन् रस्त्यावर येऊन दाखल झालों. आजची संध्याकाळ ही अशी गेली. मनाला वाटत होतं, आजच्या या भेटींत, अत्यंत गंभीर असं कांहीं तरी आमच्या अंत:करणाला चटका लावून गेलं आहे !

सांत्वनेशीं बोलत तिच्या घरांत तिच्या दुर्दैवाची कर्मकहाणी ऐकत अन् पहात बसलों होतों, त्यामुळें कीं काय न कळे, पण मन कसं भावावेगानें व्याकुळल्यासारखं होऊन गेलं होतं. गल्लीतून बाहेर पडून आम्ही मोठ्या रस्त्यावर आलों, आणि मग ह्या भावावेशांतून मी जसा कांहीं पुन्हा जागा झाल्यासारखं मला वाटायला लागलं. सांत्वनेच्या सान्निध्यांत होतों तोंपर्यंत माझ्या चेतनाशक्तीचं मूळ जणूं काय शिथिल झाल्यासारखं होऊन गेलं होतं; पण राजमार्गावरील जाणाऱ्या येणाऱ्यांची वर्दळ, दिव्यांचा झगझगाट वगैरे पाहिला, गाडी-घोड्यांची धामधूम पाहिली,आणि मन पुन्हा थाऱ्यावर आल्यासारखं वाटायला लागलं. स्वत:च स्वत:ला हरवून बसलों होतों ते पुन्हा सांपडलों, असा भास झाला. हातांतली काठी अधिक घट्ट पकडून धरली, अन् दृढपणानें पावलें उचलायला लागलों मी. असंच

वाटतं होतं, जणूं काय कुठल्यातरी एका अत्यंत गूढ, रहस्यपूर्ण अशा विश्वांत फेरफटका मारून मी आतां परतलों आहें, तें विश्व ह्या पृथ्वीपेक्षां, ह्या संसारापेक्षां अगदींच निराळं आहे. इथल्या जन-संमर्दाचा हा बुजबुजाट, हा कोलाहल तेथपर्यंत पोहोंचूंच शकत नाहीं, असं तें एक निराळंच विश्व आहे ! ह्या यंत्रजर्जर नागर संस्कृतीच्या रणांगणाच्या मध्यांतून जर एकाद्या जादूच्या सामर्थ्यानें आपण उचललों गेलों, आणि लता-वृक्षांनीं परिवेष्टित तपोभूमींतील सामगानाचा उद्घोष चालू असलेल्या एकाद्या पर्णकुटींत जर आपण अनपेक्षितपणें येऊन उभे झालों, तर आपल्याला कसं वाटेल ? तशीच कांहींशी मनाची अवस्था झालेली होती.

रस्त्यावर आम्ही आलों, आणि सोमेश्वरांनीं विचारलं, " कोणीकडे जायचं आता ? "

" कोणीकडे जायचं म्हणजे काय ? घरीं नाहीं का जायचं आतां ? "

" घरीं ? हं ! अशीसुद्धां वेळ येते कधीं कधीं, जेव्हां वाटायला लागतं, नको तें घरीं जाणं ! त्यापेक्षां रस्त्यां-रस्त्यांतून असंच भटकत रहावं ! "

मी थोडासा सूर चढविला आणि म्हणालों, "आज किती दिवसापासून मी तुमच्याबद्दल एक गोष्ट पाहत आलों आहें, सोमेश्वर. आज सांगतों ती. शुक्लपक्षांत तुमचं मन अन् डोकं थाऱ्यावर नसल्यासारखं होऊन जातं पुष्कळसं ! अहो, हें काय बोलणं झालं तुमचं ? घरीं जायचं नाहीं, तर रात्रीच्या वेळीं, अशा म्हातारपणीं, आपण कुठें जायचं दुसरीकडे ? "

पण माझ्या बोलण्याकडे त्यांचं लक्ष नसावं नीटसं. आपल्याच तारेंत असल्यासारखे ते म्हणाले, " मनाला वाटत आहे, जसं कांहीं तीर्थ-क्षेत्रांत देवाचं दर्शन घेऊनच परत येतों आहोंत आपण ! "

हा माझा स्वभाव म्हणा कीं काय वाटेल तें म्हणा, पण सोमे-

श्वरांचे हे उद्‌गार ऐकून मी एकदम उसळलोंच. म्हटलं, " तुम्हाला काय वाटतं सोमेश्वर ? त्या पोरीच्या सती-साध्वीपणाचं चित्र पाहून मी अगदीं मुग्ध होऊन गेलों असेन ? खरं बोलायचं म्हणजे मला तिच्या ह्या असल्या वर्तनांत मोठेपणा किंवा शहाणपणा मुळींच दिसत नाहीं. तुम्हाला पटणार नाहीं माझं म्हणणं, अन् आवडणार तर नाहींच तें. पण आपल्याला जें वाटतं तें स्पष्ट स्पष्ट बोलून टाकतों बुवा ! अहो, तिच्या त्या नवऱ्यासारख्या अयोग्य, अकर्मण्य माणसाच्या पायाशीं रोज रोज हा स्वत:चा असा बळी देत सुटणं, म्हणजे काय शहाणपणा झाला ? नुसत्या मृगजळाच्या मागें वेडपटासारखं धांवत सुटायचं, यालाच तुम्ही सतीत्व म्हणतां ? एक दिवस नाहीं, दोन दिवस नाहीं, तर महिनोगणती, वर्षानुवर्षं तृणासनावर बसून जप करीत रहायचं, ह्याला म्हणतां तुम्ही सतीत्व ? पतीची चरण-सेवा आणि दासीपणा इतकी मोठी गौरवाची गोष्ट आहे ? "

सोमेश्वर सरळ माझ्याकडे टवकारून पहात म्हणाले, " ठीक आहे. मला इतकंच सांगायचं आहे तुम्हांला. तुमच्या ह्या लोकप्रिय प्रथितयश कादंबरीकाराच्या नायिकेच्या चारित्र्यांतले आदर्श पुढें ठेवून ह्या बाबतींत, अन् ह्या पोरीसंबंधीं विचार करूं नका म्हणजे झालं ! "

मीहि लगेच उत्तर दिलं. म्हटलं, " विचार करण्याच्या किंवा आदर्श पुढें ठेवण्याच्या गोष्टी चाललेल्याच नाहींत. पण तुम्हाला एवढं तरी कबूल आहे ना, कीं आमचे लोकप्रिय, प्रथितयश कादंबरीकार कुठल्याहि अवास्तव, अनैसर्गिक स्वरूपाच्या स्त्री पात्राची निर्मिति करून उगाच आकाश-पाताळ एक करीत सुटत नाहींत ? "

पण सोमेश्वरहि कांही कमी नव्हते. ते म्हणाले, " त्याचं कारण अवास्तवाला सुद्धां वास्तवासारखं भासवून दाखविण्याचं सामर्थ्यं त्यांच्या लेखणींत नाहीं ! साहित्याच्या परिभाषेंत बोलायचं तर असं

म्हणावं लागेल कीं, जें अप्रत्याशित, अकल्पनीय, असंभव त्यालासुद्धां रसयुक्त स्वरूपांत समोर आणून करणं, हीच साहित्याची खरी शक्ति आहे. तुमच्या त्या प्रथितयश कादंबरीकारांच्या साहित्यिक प्रतिभेचा एकमेव गुण कोणता आहे, तें सांगू तुम्हाला ? संभावित घरांतल्या पोरीबाळींना वेश्येंत रूपांतरित करून टाकायचं, अन् हीन चारित्र्याच्या तरुणींच्या कपाळीं सतीसाध्वीपणाचा छाप मारून मोकळं सोडायचं! काळाचा महिमा आहे हा ! सर्वसाधारण माणसांच्या नजरेंत ते तुमचे साहित्यिक हा असला धंदा करूनच मोठे होऊन बसले आहेत, एवढंच ! पण जाऊं द्या तें सारं. हवी कशाला आपल्याला नसती कटकट ? चला घरींच जाऊं या, झालं ! ”

एवढें बोलून सोमेश्वर कांहींसे रागारागानेंच चालूं लागले.





बोलायला बोललों तर खरं मी हें ; पण तरीहि कुठें तरी, कांहीं तरी चूक राहून गेलीच, अशी भावना माझी माझ्या मनालाच टोचूं लागली. नुसत्या नवऱ्याच्या लाथा खात राहाणं, त्याची सेवा-चाकरी करीत राहाणं, त्याची दासी म्हणून मिरवीत राहाणं, ह्यांतच स्त्रीचा गौरव नाहीं, ह्यामुळेंच स्त्रीचं श्रेष्ठत्व प्रस्थापित होऊं शकत नाहीं, अशा अर्थाच्या गोष्टी बोलून मी सांत्वनाला तिच्या उच्च पदा-वरून खालीं ओढून तर काढलं. ह्यालाच स्त्रीचं सतीत्व म्हणणं ही चूक आहे असंहि मी बोलून गेलों. पण जगाचा जन्मभर अनुभव घेऊन म्हातारा झाल्यानंतरहि माझं मन अंतर्यामीं मला सारखं हेंच सांगत आहे; हा असल्या जातीचा स्त्रीचा सतीत्वाचा स्वभाव जर सोडला,

तर तिच्या प्रेमाची ओळख पटण्याचा दुसरा कोणता मार्ग असूं शकतो का ? एका अयोग्य, अपात्र, अकर्मण्य माणसाच्या पायाशीं सांत्वना स्ततःचं बलिदान करीत आहे, असंहि मी बोललों होतों. पण खरोखरीच तें असंच होतं का ? हें तिचं बलिदानच होतं कीं दुसरंच कांहीं होतं ? सोमेश्वर म्हणाले होते, सांत्वनाच्या मानस-मंदिरांत प्रेमाचं एक भावरूप काना–कोंपरा व्यापून बसलेलं आहे, आणि तिचा पति त्याच मनो–मंदिरांत स्थापन केलेली एक रस–मूर्ति आहे ! तो तिचा नवरा अकर्मण्य होता, अंथणाला खिळलेला होता, पंगु बवलेला होता, ही कांहीं महत्वाची गोष्ट नव्हती सांत्वनेच्या बाबतींत. ती त्यांची सेवा करीत आहे असं बाहेरचं जग म्हणतं ; पण सांत्वना सेवा करीत होती ती त्या पांगळ्या नवऱ्याची नाहीं ; ती सेवा करीत होती आपल्या आंतर-देवतेची ! पतीची सेवा चाकरी करण्याच्या निमित्तानें बायका आपली पूजा आराधाना खरो-खरी रुजू करीत असतात आपल्या मनोमंदिरांतल्या आराध्य प्रेमदेवाची !

सोमेश्वरांना काय सांगायचं होतं तें माझ्या जरी लक्षांत आलं असलं, तरी सर्वसाधारणपणें समजायला गोष्ट थोडीशी अवघडच होती. मी म्हटलं, "स्त्री जातीच्या चरित्र–स्वभावाविषयीं बोल-तांना समजायला भारी कठीण, दुर्बोध असं कांहीं तरी सुचवून सांगायची आजकाल एक फॅशनच होऊन बसली आहे !"

सोमेश्वर ह्यावर म्हणाले, "मी जें कांहीं बोललों तें दुर्बोध असेल, सहजासहजीं समजायला सोपं नसेल, हें कबूल करतों मी. पण त्याची नुसती सूचनाच फक्त मी दिली आहे, हें मात्र नाकबूल आहे मला. जो वस्तुस्थिति आहे असं मला वाटत आहे, तिचंच हें वर्णन आहे ; ह्यांत गर्भित सूचना, सजेशन–बिजेशन कांहीं सुद्धां नाहीं. तुमच्या प्रथितयश लोकप्रिय कादंबरीकाराच्या भाषेंत बोलायचं तर स्त्री ही एक गूढ आहे, ती दुर्ज्ञेय आहे, असं म्हटलं पाहिजे."

व्हिस्कीच्या पेल्यांतून एक घोट घेऊन सोमेश्वर हळूं हळूं बोलूं लागले. म्हणाले, " परमेश्वरानं निर्माण केलेली ही सारी सृष्टीच एक महाकाव्य आहे, अन् इथें आलेला प्रत्येक मनुष्य, स्त्री अन् पुरुष एक एक सिम्बॉल आहे. त्याच्या चरित्राच्या अन् स्वभाववैचित्र्याच्या मधूनच आपल्याला विश्वाच्या विपुल ऐश्वर्याचा अनुभव होत असतो. बाह्य रूपाच्या पलीकडे असतो रस; उच्चारलेल्या शब्दाच्या पलीकडे असते व्यंजना; फुलाच्या पलीकडे ज्याप्रमाणें त्याचा सुगंध असतो ना, त्याप्रमाणेंच ! सांत्वनाची गोष्ट एक सोडा. ती दुर्बोध असेल, दुर्ज्ञेय असेल, एनिग्मा असेल ! पण अशाहि किती तरी स्त्रिया आहेतच ना, ज्या अंतर्बाह्य अगदीं साध्यासुध्या असतात, सरळ असतात, ज्यांना समजूं शकणं मुळींसुद्धां कठिण नसतं माणसाला ! "

मी म्हणालों, " म्हणजे, सांत्वना काय साधीसुधी, सरळ पोरगी नाहीं ? ती काय आहे तें समजायला सोपं नाहीं, असं म्हणायचं आहे तुम्हाला ? "

सोमेश्वर म्हणाले, " तुम्ही विचारला तो प्रश्न माझ्या मनांतहि येऊन गेला आहे. पण एक गोष्ट सांगतों तुम्हांला, तिचा विसर पडूं देऊं नका. कोणतीहि स्त्री ही काय वस्तू आहे, तिचं खरं खरं व्यक्तित्व कसं आहे, त्याचा उमज तिच्यावर मनापासून प्रेम केल्या-वांचून पडणं शक्य नाहीं माणसाला ! "

" अहो, अहो ! शु: ! गप्, ऐकेल कोणी ! "

" अंहं, घाबरूं नका असे. अनीतीच्या, अश्लीलपणाच्या गोष्टींची चर्चा छेडीत नाहीं मी ! मला तुम्हांला सांगायचं एवढंच, कीं स्त्रीची खरी ओळख पटायचा एकच मार्ग आहे अन् तो आहे प्रेमाचा मार्ग ! नाहीं तर, अशाहि स्त्रिया मी बघितल्या आहेत, त्यांना मानस-शास्त्राच्या वैज्ञानिक परीक्षणाच्या काय किंवा मानवी चरित्राच्या दुर्ज्ञेय रहस्याच्या काय, कोणाच्याहि कुठल्याहि पातळीवर बसवतां

येणं अशक्य आहे. आजकाल तुमचं तें सायको अनॅलिसिस कीं बायको अनॅलिसिस असं कांहीं निघालं आहे ना ? ”

मी हंसून म्हणालों, “ बायको-अनॅलिसिस ?”

“ हं ” सोमेश्वर पुन्हा गंभीर होऊन म्हणाले, “ अहो, बायको अनॅलिसिसच नाहीं तर काय ? मला तरी तुमच्या ह्या नव्या मानस-शास्त्राच्या अवडंबरांत दुसरं कांहीं आढळलं नाहीं फारसं. ”

“ हा मता-मतांचा प्रश्न आहे. पण तें कांहीं जरी असलं, तरी तुमचा हा ‘ बायको-अनॅलिसिस ’ शब्द मात्र आवडला आपल्याला. पण काय सांगत होता तें तर तसंच राहून गेलं. ”

“ सांगतों ना; तेंच तर सांगतों आहें. जगांत तऱ्हेतऱ्हेचीं माणसं आहेत, मनं आहेत अन्, स्वभाव आहेत अन् त्यांत, माणसाचं मन ही तर एक विचित्रच गोष्ट घडविली आहे परमेश्वरानं. स्वतःचा स्वतःलाच थांगपत्ता लागत नाहीं त्या मनाच्या बाबतींत; मग दुसऱ्यांना तो लागला अस कसं म्हणावं ? तुमचं बायको–अनॅलिसिस नाहीं, सायको अनॅलिसिसवाले जेव्हां छातोठोकपणें अट्टाहासानें सांगायला लागतात, ही व्यक्ति ही अशी अशी आहे, तेव्हां खरं सांगूं तुम्हाला, मला त्या बिचाऱ्यांचं हंसूच यायला लागतं. तुमच्या साऱ्या शास्त्रांच्या परिमाणांच्या अन् परिभाषांच्या वैज्ञानिक चौकटींत ज्या कुठेंच बसूं शकत नाहींत, अशाहि बायका मी पाहिल्या आहेत माझ्या आयुष्यांत-अगदीं जवळून पाहिल्या आहेत. ”

बोलतां बोलतां, माझ्या कुतुहलानें भरलेल्या मुद्रेकडे एकदा पाहून घेऊन सोमेश्वरांनीं आपले प्रशांत, मदालस नेत्र मिटून घेतले. मीहि हुक्क्याची नळी हातांत उचलली. ह्या डोळे मिटून घेण्याचा अर्थ काय तें मी अनुभवानं चागलं ओळखलं होतं. आतां सोमेश्वर आपल्या आयुष्यांतली कोणतीतरी घटना सांगायच्या रंगांत आले आहेत, हाच त्याचा अर्थ होता. मीहि तयार होऊन बसलों ऐकायला. उत्सुकता होतीच मनांत.

हळूं हळूं सोमेश्वर सांगूं लागले, "मला वाटतं, मी तुम्हाला कधींतरी सांगितलं होतं, माझ्या आयुष्यांत एक वेळ अशी आली होती, ज्या वेळीं सुखविलासांनीं भरलेलं माझं आयुष्य मला अगदीं नकोसं वाटायला लागलं होतं. त्याच दिवसांतली गोष्ट आहे ही."

"हं."

"त्या वेळीं मृणाल निघून गेलेली होती. मीहि लग्न करून संसार थाटला होता. मन लावून घर–संसारांत निमग्न होऊन गेलों होतों मी कांहीं काळपर्यंत. मला कोणत्या गोष्टीची कमतरता होती ? बायको–मुलं, नोकर-चाकर, ऐश्वर्य, धन, संपत्ति, अधिकार, ह्या जगांत माणसाला हव्या त्या सर्वच गोष्टी हात बांधून माझ्या दिमतीला उभ्या होत्या. जगानें हेवा करावा असंच माझं भाग्य होतं."

"खरं आहे."

"पण, तुम्हाला सांगूं का ? माझ्यासारख्या भावप्रवण–रोमँटिक म्हणतात कोणी त्याला, कोणी म्हणतात, सेंटिमेंटल–स्वभाव प्रवृत्तीच्या माणसाच्या बाबतींत कीं नाहीं, एकामागून एक त्याच्या सार्‍या काम्य वस्तू त्याला मिळूं लागल्या ना, कीं तोच काळ असल्या माणसाच्या आयुष्यांतला दुर्दिन."

"कां बरं ? असं कां म्हणता ?"

"कां बरं ? कां तें कसं सांगूं तुम्हाला समजावून ? जेव्हां मिळवण्याजोगं आयुष्यांत कांहींच उरत नाहीं, ज्याच्यासाठीं धडपडावं असं कुठें कांहीं दिसत नाहीं, कारण सारंच कांहीं इच्छिलेलं समोर आलेलं असतं, अशाच वेळीं कांहीं तरी मोठें, खूप मोठें मिळविण्यासाठीं माणूस अधीर होऊन उठतो, हें तरी कळतें कीं नाहीं तुम्हांला ?"

"अहं."

" तर मग, अधिक कांहीं सांगत नाहीं. नुसतं एवढच सांगतों कीं हें असं होतं माझ्यासारख्या वृत्तीच्या माणसाच्या बाबतींत."

" होत असेल बुवा ! नाहीं कसं म्हणावं ? जगांत सर्वच तऱ्हेचीं माणसं असतात ! "

" तेंच तर म्हणतों आहें मी. पण माणूस दुसऱ्याची ओळख करून घ्यायला जातो स्वतःच्या स्वभावावरून ! तुम्ही ऑब्जेक्टिव्ह रिॲलिटीचा कितीहि आव आणला, तरी दुसऱ्याबद्दलचं तुमचं आकलन अन् मोज–माप कळत–नकळत तुमच्या स्वतःच्या मनाच्या अन् वृत्तीच्या घडणीच्या सहाय्यानेंच होणार ना शेवटीं ? जी कांहीं गडबड होते ती इथेंच. आपण आपल्या दृष्टीनें म्हणतों, अमुक माणूस असा आहे, तसा आहे. पण तो खरोखरीच कसा आहे तें आपण कसं सांगणार ? "

" अं: ! तें जाऊं द्या. तुम्ही आपली गोष्ट सांगा झालं. "

" हं. तर असा तो काळ होता माझ्या आयुष्यांतला. सुखाच्या शय्येवर लोळत पडलों होतों. पण त्या अवस्थेंत यौवन काळाच्या ऐन भरात, माझ्या मनांत खोल कुठेंतरी कांट्यासारखं कांहीं तरी एकसारखं बोचत होतं, खुपत होतं. मी बेचैन होऊन गेलों. मन घरांत रमेना. त्यामुळें मी उठल्या सुटल्या भटकायला निघायचा. रस्त्यारस्त्यांतून भटकत सुटायचा मी. निरनिराळ्या प्रदेशांत, गांवोगांवीं अन् शहरोंशहरीं उगाच प्रवास करीत हिंडायचा. खूप खूप प्रवास केला मी. पण मनाचा उद्वेग कांहीं शांत झाला नाहीं, कीं त्याला थकवा आला नाहीं. आज, कांहीं नाहीं तरी पचवीस वर्षांचा काळ लोटला असेल त्या गोष्टीला. "

सोमेश्वर मध्येंच थांबले. व्हिस्कीचा एक घोट घेतला आणि मग पुन्हा त्यांनीं बोलायला सुरुवात केली. ते म्हणाले, " माझं मन त्या काळींहि नवीन नवीन गोष्टींची जाणकारी करून घेण्याच्या इच्छेनें भरून गेलेलं होतं. कुतुहल आणि औत्सुक्य माझ्या दृष्टींत त्या

परिस्थितींतहि दाटलेलंच होतं. तेव्हां तरुण होतों ना मी ! आजच्या-सारखा म्हातारा झालेलों नव्हतों तेव्हां. सारं कांहीं पाहून अनुभवून घेतल्याच्या अहंकारानें जगाकडे करुणेच्या दृष्टीनें पहायला शिकलों नव्हतों मी तेव्हां ! "

"हं ,"

"कुठल्याशा तीर्थक्षेत्रांकडे जाणाऱ्या आगगाडींत बसून मी चाललों होतों. ,"

" तीर्थक्षेत्राकडे ? "

" हं. तीर्थयात्रेच्या निमित्तानें देशभर भ्रमंती करीत फिरण्याची माझी वासनाच मी पुरवून घेत होतों, दुसरं कांहीं नाहीं. रस्त्यात दोन ठिकाणीं गाडी बदलावी लागत होती. तिसरा प्रहर टळून गेला होता. दूर, क्षितिजाच्या बाजूनें, अस्तगामी सूर्याच्या किरणांनीं संध्या-काळचं आकाश रंगीत होऊं लागलं होतं. अशांतच कुठल्याशा एका स्टेशनवर गाडी थांबली. प्रवाशांची ही झुम्मड. आंत डब्यांत माणसांची खेचाखेच, तशीच बाहेर प्लॅटफॉर्मवरहि ! बरेचसे उतारू डब्यांतून बाहेर उतरण्याच्या धांदलींत होते, अन् त्यापेक्षांहि अधिक आंत येण्याच्या प्रयत्नांत होते. एकच हांकाहांक आणि धांदल उडाली होती. सारं स्टेशन नुसतं गजबजून गलं होतं. कांहीं वेळ गाडी तिथें उभी होती ; त्यानंतर वेळ होतांच पुन्हा सुरु झाली. अशा वेळीं मी पाहिलं, बाहेर प्लॅटफॉर्मवर एक निराळाच गोंधळ सुरू झाला होता. प्रकार खरोखरी काय होता, तें कांहीं पूर्णपणे मला त्या वेळीं समजूं शकलं नाहीं; समजून घेण्याची फारशी उत्सुकताहि नव्हती मला. जें पाहिलं त्यावरून मला कळूं शकलं तें एवढंच, कीं प्लॅटफॉर्मवरच्या त्या गर्दींत एक म्हातारी अन् तिच्याबरोबर एक तरुण असे दोघे गाडीच्या एका टोकापासून तों दुसऱ्या टोकापर्यंत, प्रत्येक डब्याशीं जाऊन अत्यंत व्याकुळ भावानें कोणाला तरी शोधताहेत ! जोर-जोरानें कोणाचं तरी नांव घेऊन ते हांकाहि मारीत होते एकसारखं.

त्या म्हातारीची अन् त्या तिच्या बरोबरच्या तरुणाची त्या वेळची ती व्याकुळ मुद्रा अजूनहि माझ्या दृष्टीपुढें स्पष्टपणें तरळते आहे. काय ती त्यांची धांवपळ ! काय ती त्यांच्या जिवाचा आटापिटा ! नागाच्या मस्तकावरचा मणि हरवला म्हणजे तो जसा त्याचा शोध करतो, चक्रवाक पक्षी ज्या व्याकुळ भावानें आपल्या सोबतिणीला साद घालीत फिरतो, किंवा रानात कोणी एकाद्या जनावराचं पिल्लू चोरून नेल्यानंतर त्या पिलाची आई जशी हताश भावानें त्याचा शोध करीत हिंडते, तसलाच तोहि प्रकार होता ! मी दगडासारखा स्वस्थ बसून त्या म्हातारीच्या अन् तिच्या मुलाचा हताश चेहरा पहात होतों. अशांत गाडी चालू सुद्धां लागली. ते दोघे त्या झपाट्यानें अदृश्य होत जाणाऱ्या गाडीकडे पहात प्लॅटफॉर्मवरच उभे होते !

"गाडी धाड-धाड करीत धांवत होती. इकडे सूर्यास्त होऊन संध्या-काळहि होऊन गेली होती. अन्यमनस्क भावानें मी आपल्या जागेवर बसून होतों. अशांत आमच्याच डब्यांत, मी बसलों होतों तेथून जरा पलीकडे, एक कसलीशी गडबड उडाल्यासारखी वाटली. म्हणून तिकडे वळून पाहूं लागलों. पाहातों, तों एका बांकाखालून, तेथें रचून ठेवलेल्या सामान-सुमानाच्या ढिगाऱ्यांतून एक तरुण पोरगी अत्यंत प्रयासानें बाहेर येण्याचा प्रयत्न करीत होती ! बाकावर माणसं दाटीदाटीनें बसलेलीं होतीं. त्यांत पुष्कळसे पुरभय्ये अन् मुसल-मानच होते. त्यांच्यापैकीं कोणाचे पाय, तर कोणाची गाठोडीं-पाठोडीं हातानें दूर सारीत ती पोरगी बाकाखालून बाहेर आली अन् उभी राहून अंगावरचा केरकचरा झटकूं लागली ! तिचं हें असलं विचित्र-पणाचं लपून राहाणं, हा चोरटेपणा अन् बेरडपणा पाहून सर्वांनाच आश्चर्य वाटत होतं. जो तो तिला तऱ्हेतऱ्हेचे प्रश्न विचारूं लागला. तिच्या वयाचा विचार केला तर काय अन् तिच्या चेहऱ्या-मोहऱ्याकडे पाहिलं तर काय, कोणत्याहि दृष्टीनें तिच्यासारख्या स्त्रीनें अशा

रीतीनें प्रवास करण्यांत धोका होता हें अगदीं स्पष्ट दिसत होतं. लोलुप अन् बुभुक्षित नजरांच्या, रोखलेल्या भाल्याच्या जाळ्यांतून ती वर उठून उभी राहातांच, पहिली गोष्ट जी माझ्या नजरेंत भरली ती म्हणजे तिनें नेसलेलें काळ्या काठाचं पांढरं पातळ, अन् तिच्या काळ्याभोर, दाट केसाच्या मधोमध भांगांत मळलेला कुंकवाचा लांब रुंद पट्टा ! जणू काय वर्षाकाळचं मेघांनीं डंवरलेलं आकाश विजेच्या लांबसडक जळत्या लोळानें दोन भागांत विभागून टाकलं होतं ! साऱ्या डब्यांतल्या लोकांच्या नजरा तिच्यावर खिळल्या होत्या, अन् सारेच तिच्याशीं बोलायचा प्रयत्न करीत होते. पण तिनें त्या प्रश्नांच्या सरबत्तीकडे किंवा तिच्यामुळें डब्यांत उडालेल्या धांदलीकडे नजर उचलून पाहिलंसुद्धां नाहीं. एकदा तिनें आपली उडती दृष्टि चोहींकडे फिरवून साऱ्या डब्याचं निरीक्षण करून घेतलं. त्यानंतर ती कौतुकानें आपल्याशींच किंचित् हंसली, आणि साऱ्या डब्यांतून तिनें नेमकं मलाच गोष्टी बोलायला लायक म्हणून निवडलं. माझ्याकडे पाहून किंचित् हंसल्यासारखं करून ती म्हणाली, 'आमच्या जातभाईपैकीं तुम्ही एक सांपडलात ह्या डब्यांत ! माझी आई अन् दादा खालीं प्लॅटफॉर्मवरच राहिले कीं तेहि गाडींत चढून बसले, कांहीं कल्पना आहे का तुम्हाला ?' "

सोमेश्वरांच्या तोंडावरच मी राग अनावर होऊन फाडकन् बोलून गेलों, " अस्सं ! अशी विश्वासघातकी, हरामखोर, बदफैली अवदसा होती ती एकूण ! "

माझे हे रागाचे उद्गार ऐकून सोमेश्वर एकदां नसते हंसले. त्यानंतर कांहीं वेळ थांबले. जणू काय, माझा राग शांत होण्यासाठींच ते मला वेळ देत असावे. त्यानंतर, माझ्या त्या उद्गाराकडे संपूर्ण दुर्लक्ष करून ते आपली गोष्ट पुढें चालू करीत म्हणाले, " मलाहि एकंदर प्रकाराचं फारच आश्चर्य वाटत होतं. त्यांतून कसाबसा तिच्या प्रश्नाचं कांहींतरी उत्तर देण्याच्या विचारांतच मी होतों, इतक्यांत ती

आली आणि माझ्याजवळ बाकावर जागा पटकावून बसली देखील. तिनें काखोटीला एक अंथरुणासारखं कांहींतरी लहानसं गाठोडं घेतलेलं होतं. एवढंच तिचं सामान ! डब्यांतल्या लोकांना वाटलं, मी तिचा कोणीतरी ओळखीचाच माणूस आहे. त्यामुळें थोडा वेळ आपापसांत कांहींतरी हंसत कानगोष्टी करून शेवटीं सारेजण आपापल्या जागीं स्वस्थ बसले. मी त्या पोरीला म्हणालों, 'पुढल्या स्टेशनवर गाडी उभी राहातांच, तुमच्या आईला अन् भावाला तार करून टाका, म्हणजे बरं. बाईमाणसानं असं एकट्यानं प्रवास करणं..' "

" पण, मला मध्येंच थांबवून ती म्हणाली, 'पुरें झालं तें ! पुष्कळ ऐकला आहे असा उपदेश !' "

ऐकून मला थोडी गंमत वाटली. मी किंचित् हंसून, कांहींसें आश्चर्य व्यक्त करीत सोमेश्वरांना म्हटलें, " काय म्हणालांत ? असें म्हणाली ती ? अंगीं अचरटपणा आणि उद्धटपणाहि भरपूर होता असं दिसतं तिच्या ! "

सोमेश्वर पुढें सांगूं लागले, " तिनें असं दटावून दिलं मला, त्यामुळें गप्प बसणं प्राप्तच होतं मला ! मला थांबवून आता ती स्वतःच बोलूं लागली. म्हणाली, 'साऱ्यांनाच असं कसं वाटतं, समजत नाहीं. माझ्या घरच्या लोकांचंहि हेंच म्हणणं, एकटी परदेशांत जाऊं नकोस ! कां जाऊं नको ? इतक्यांदा अशीच पळून जाऊन मी किती किती ठिकाणीं फिरून आलें, सारा मुलुख पायाखालीं घातला आहे मी, एकटीनंच प्रवास करून अन् तरीहि त्यांना वाटतं, मी एकटी घर सोडून बाहेर पडलें कीं कुठल्या ना कुठल्या आपत्तींत सांपडल्याशिवाय कांहीं राहाणार नाहीं ! कांहीं केल्या मला जाऊं द्यायलाच तयार नव्हती आई अन् दादा. थोडे पलीकडे सरका. एवढं अंथरूण पसरतें, म्हणजे मग बसायला बरं.'

" डब्यांत अगोदरच गर्दी होती. मलाच कशी तरी बसण्यापुरती जागा मिळालेली होती. त्यांतच तीहि शेजारीं येऊन बसली आणि

आतां म्हणते, उठा, अंथरूण पसरायचं आहे. मनांत थोडासा रागच आला होता मला तिचा. पण नाहीं म्हणायची कांहीं सोय नव्हती. उठून तिला अंथरूण पसरायला जागा करून देणें भागच पडलं मला !"

" छान ! "

" तिचे डोळे अन् नजर विलक्षण चंचल होती. पण चटुल प्रकृतीच्या, चारित्र्यानें अशातशाच, चवचाल स्त्रीची थिल्लर, चटोर, दृष्टि नव्हती ती. त्या चंचलपणाची जात कांहीं निराळी होती. अर्धवट वेडसर माणसाच्या नजरेंत असतो तसल्या प्रकारचा अस्थिरपणा होता तो. "

" आं ? "

" तिनें झटकून पुसून अंथरुण पसरलं, आणि मग स्वस्थ, निवांत मनानें त्यावर बसून तिनें एकदां पदरानें तोंड पुसल्यासारखं केलं; कपाळावर आलेलें केंस मागें सारले. डाव्या हातानें पुन्हा पुन्हा तोंडावरचे केस मागें सारण्याची तिला खोडच होती ! "

" अरे वा ! बरंच बारीक निरीक्षण केलं होतं तुम्ही सोमेश्वर ! "

" मी तिला विचारलं, 'तिकिट बिकिट काढलं आहे कीं नाहीं ? '

" ती म्हणाली, राहूं द्या हो. तिकिटाचं काय मोठंसं ! माझी कांही रेल्वे कंपनीला किंवा कोणाला फसवायची इच्छा नाहीं. जवळ पैसे आहेत माझ्या भरपूर. घेईन पुढें तिकिट काढून. त्याचं काय मोठंसं ? जवळ पैसे आहेत; त्याशिवाय ह्या पहा, हातांत सोन्याच्या बांगड्या आहेत, गळ्यांत सोन्याची साखळी आहे. तशी कांहीं काळजी नाहीं !'

" मी म्हटलं, पण तिकिट न काढतांच गाडींत बसलं, तर पुढें विनाकरण दुप्पट पैसे द्यावे लागतील ना. अन् दंड भरावा लागेल तो निराळाच.

" ती एकदम उसळून म्हणाली, ' दुप्पट पैसे ? अन् दंड ? अन् तो माझ्यापासून ? तुम्ही कांहीं बोलूं नका. ठाऊक नाहीं तुम्हांला ! सगळीकडचे स्टेशन मास्तर मला ओळखतात, ठाऊक आहे ? ' आणि असें म्हणून ती हंसायला लागली ! "

" अरे वा: ! "

" ज्यांना 'परम सुंदर' म्हणतात अशा रंभा-उर्वशी-तिलोत्तमा-सारखी ती सुंदर होती असं कांहीं म्हणतां यायचं नाहीं. पण, तिला रूप होतं, ह्यांतही शंका नाहीं. अन् तें रूप चारचौघांत एकदम उठून दिसेल असें आकर्षक होतं, हेंहि कांहीं खोटं नाहीं. पण असं असूनहि तिच्याबद्दल कोणी कांहीं भलता सलता विचार मनात येऊं देण्याचीहि सोय नव्हती ! विजेचं यंत्र ज्या ठिकाणीं असतं, तेथें तुम्ही पाहिलं असेल, कोणी जवळ येऊं नये म्हणून, त्या यंत्राच्या चारी बाजूंनीं लोखंडी कुंपण घातलेलं असतं, अन् फळ्यावर लिहून ठेवलेलं असतं, 'सावधान ! धोका !' तिच्या आकर्षक रूपाच्याहि आवतीं-भोंवतीहि असंच कुंपण घातल्यासारखं होतं. तिथपर्यंत जाण्याचा पुरुषांच्या मनाला जणूं काय निषेधच होता. एकटी, तरुण, देखणी आणि अर्धवट, असं असूनहि कोणाच्याहि मनांत तिच्याबद्दल लोलुप वासना मात्र निर्माण होणंच अशक्य होतं, असं कांहीं तरी होतं तिच्या ठायीं ! आपल्या मर्जीप्रमाणें साऱ्या जगाला नाचवीत, स्वैरपणें हिंडणारी अशी स्त्री तुम्ही पाहिली आहे कधीं ? "

" आश्चर्य आहे ! "

" तिच्या मस्तकावरचं तें सौभाग्य चिन्ह ! तें पाहून माणसाच्या मनांत तिच्याबद्दल संभ्रम आणि आदर जागृत करी; एवढंच नाहीं तर माणसाला तिच्यापुढें वांकायलाहि लाली. आंतल्या आंत, तिच्या-बद्दल कांहींसं भयहि पाहाणाऱ्याच्या मनांत उत्पन्न झाल्यावांचून राहात नसे. तिच्या दृष्टीला दृष्टि भिडवणं शक्य नव्हतं. "

" अस्सं ! "

"मी तिला प्रश्न केला. म्हटलं, 'कुठें जाणार तुम्ही ?'

"ती म्हणाली, 'तें कांहीं नक्की नाहीं. पाहूं या, गाडी कुणीकडे जाते तें. तुम्ही कुठें जाणार ?'

"मी म्हटलं, 'मी ? मी चाललों आहें गैबीनाथाला !'

"ती म्हणाली, 'गैबीनाथाला ? यात्रेला निघाला आहांत वाटतं ! बरोबर आहे. ह्या दिवसांत तिथें खूप मोठा मेळा भरत असतो दर वर्षीं ! चला, मी पण येतें गैबीनाथालाच ! पण तुम्हाला ठाऊक आहे ना ? पुष्कळसा प्रवास पायींच करावा लागतो पुढें तिथें जायचं म्हणजे. अन् रस्ताहि कांहीं साधा नाहीं. भारी त्रासदायक आहे तिथला प्रवास. चालवेल तुमच्यानं ? त्रास नाहीं होणार ? रस्त्यांत धड खायला प्यायला मिळायचीही नीटशी सोय नाहीं. भारीच वाईट लोक आहेत तिकडचे. इतका सारा त्रास सोसून शेवट-पर्यंत जाण्याची आहे हिंमत तुमची ?' "

"असं म्हणाली ती ?"

"तिच्या बोलण्याची तऱ्हाच ही अशी बेफाट होती. बायकाबाबत जी एक प्रकारची नम्रता, एक प्रकारची मर्यादा आपण पाहतों, ती तिच्या ठिकाणीं नांवालासुद्धां दिसत नव्हती. तिची ती उद्दाम बेपर्वाई पाहून मीच मनांत वरमल्यासारखा झालों. तिच्याशीं बोलण्याचीसुद्धां हिंमत करवेना मला. अहो, असल्या वेडसर पोरीबरोबर बोलण्या-चालण्याची सोय का आहे, असाच प्रश्न माझ्या मनाला भेडसावूं लागला. वाटलं,बरं तर बरं,पण जर का कुठें तिच्या मनाविरुद्ध कांहीं माझ्या तोंडून निघून गेलं,तर फाडकन् काहीं तरी बोलूनसुद्धां बसायची ती मला ! अपमान करायला ती मागें पुढें थोडीच पाहणार ? उगाच हात दाखवून अवलक्षण कशाला करून घ्या ? म्हणून मी संकोचानें गप्प बसून राहिलों."

"बरोबरच आहे. हें काय बोलणं झालं बायकांच्या जातीचं ?"

"मोठमोठाले तेजस्वी डोळे, आकर्षक चेहरा-मोहरा, स्नेहलेशहीन

रुक्ष रूप, बलिष्ठ देह, जशी कांहीं संगमरवराच्या दगडाची कोरून घडवलेली सुंदर मूर्तीच ! तोंड वर करून तिच्याशीं दोन शब्द बोलायचे म्हटले तरी मनाला संकट वाटायचं; पोटांत गोळा उभा रहायचा भीतीनं !"

"चमत्कारिकच होती ती एकूण !"

"हं ऽ !"

'बरं; मग पुढें काय झालं ?"

"बरींच वर्षं होऊन गेलीं आहेत त्या गोष्टीला आतां. त्यामुळें प्रत्येक लहान-सहान गोष्ट काहीं लक्षांत नाहीं माझ्या आता. फक्त, काय घडलं, तेवढंच आठवतं आहे, तें मी तुम्हाला सांगतों. मूळ चित्र आज शिल्लक उरलेलं नाहीं. शिल्लक उरले आहेत केवळ रंग. ते सुद्धां पाण्या-पावसानें, ऊन-वाऱ्यानें पुष्कळसे धुऊन गेलेले, उडून गेलेले. त्यावरून फक्त पुसटशी कल्पना येईल तुम्हाला त्या प्रकरणाची."

बोलतां बोलतां सोमेश्वर थांबले आणि त्यांनीं व्हिस्कीचा पेला उचलून तोंडाला लावला. सांगायची होती ती गोष्ट शक्य तेवढी सुसंगत स्वरूपांत मनांत जुळवून ठेवण्यासाठींहि कदाचित ते थोडे थांबले असावे. व्हिस्कीचे दोन घोंट पोटांत ढकलून ते पुन्हा सांगूं लागले. म्हणाले, "इसलामपूरच्या घाटाला येऊन आमची गाडी थांबली. हो, एक गोष्ट सांगायची राहूनच गेली. त्या तरुणीचं नांव होतं चारुबाला ! बोलतां बोलतां तिनें, कांहीं नाहीं तरी पंचवीस वेळां तरी सांगितलं असेल तोंपर्यंत, माझं नांव चारुबाला आहे म्हणून! गाडी थांबली आणि आम्ही खालीं उतरलों. मी पहिल्यानेंच या गावीं आलों होतों. कुठें जायचं, काय करायचं, मला कशाचीच कांहीं कल्पना नव्हती. पण चारुबालेनें माझा ताबाच घेतला होता म्हणा ना ! तिला तिथली सारी माहिती अगदीं पुरेपूर होती असं दिसलं. स्टेशनवरून आम्ही निघालों. तिला सारे रस्ते बिस्ते चांगले ठाऊक

होते. ती स्टेशनवरून मला सरळ एका धर्मशाळेंत घेऊन गेली धर्मशाळेंतहि बायका–पुरुषांची ही गर्दी ! कुठें आम्हाला राह्यला जागा मिळेल, हाच प्रश्न होता. पण तो प्रश्न असलाच तर माझ्यापुढें होता. चारुबालेला कशाचीच चिंता नसल्यासारखी दिसत होती. रात्रभर त्या धर्मशाळेंत मुक्काम करायचा होता. त्यानंतर दुसरे दिवशीं सकाळीं बोट सुटणार होती. त्या बोटीनें पुढें जायचं होतं; पण रात्रीपुरत्या मुक्कामाला तरी त्या धर्मशाळेंत जागा मिळेल असं मला कांहीं वाटलं नाहीं. धर्मशाळेंत मुक्काम करून असलेले सारेच लोक गैबीनाथच्या यात्रेसाठींच निघाले होते. जिकडे तिकडें अस्ताव्यस्तपणें पसरलेल्या सामाना-सुमानाच्या ढिगाऱ्यांतून वाट काढीत, माणसांच्या अंगाला कधीं घसटून तर कधीं त्यांच्या मधूनहि वाट काढीत चारुबाला पुढें चालली होती, आणि मी तिच्या मागें मागें चाललों होतों. जातां जातां, आम्ही दोघे धर्मशाळेच्या अगदों पलीकडच्या कोपऱ्यांतल्या एका कोपऱ्याशीं येऊन पोहोंचलों. तिथें जागा अगदीं मोकळी होती. यात्रेकरूंना ह्या जागेचा पत्तासुद्धां नसावा. पण तिला मात्र तो होता ! साऱ्याच गोष्टींची तिला जशी कांहीं पूर्ण माहिती असावी; तें गांव अन् ती धर्मशाळा ह्यांचा तिला पूर्ण परिचय असावा, असं स्पष्ट दिसत होतं. तोंडावाटे एक शब्दहि न काढतां, ती करील ती सारी व्यवस्था मुकाट्यानें मान्य करण्या-खेरीज मला दुसरा उपायच नव्हता ! त्या वेळीं माझ्या मनाची अवस्थाच कांहीशी विचित्र झाली होती. चारुबालेच्या विलक्षण प्रभावानें मला इतकें भारून टाकल्यासारखं केलं होतं कीं मी माझं व्यक्तित्वसुद्धां हरवून बसलों होतों असं म्हटलं तर चुकीचं होणार नाहीं. त्या परिस्थितींत माणसाचं व्यक्तित्व शिल्लक राहावं तरी कसं ? रात्र झालेली, आसपास काळाकुट्ट अंधार पसरलेला, पलीकडे धर्मशाळेंतल्या लोकांची गडबड अन् कोलाहल हळूं हळूं कमी कमी होत चाललेला ; उजेडाचं कुठें नांव नाहीं, अन् ह्या सर्वांमधून मला

काय करायचं,काय नाहीं त्याबद्दल हुकूम सोडीत असलेली ती अज्ञात-कुल-शील अशी चारुबाला ! असा प्रसंग कधीं कोणाच्या आयुष्यांत घडला आहे कीं नाहीं, कोण जाणे !

"कांहीं का असेना ? रात्रीच्या मुक्कामापुरती जागा तर छान मिळाली. अगदीं निवांत, अन् एकीकडे. आम्हां दोघा जीवाशिवाय तिसरी व्यक्ति तेथें कोणी नव्हती. आम्ही आपलं सामान सुमान ठेवलं. चारुबालेनेंही आपली वळकटी माझ्या स्वाधीन केली, आणि 'पहा, जागा नीट संभाळा. मी ही आलेंच इतक्यांत ' असें म्हणून ती निघून गेली. मी तर प्रवासाच्या श्रमानें थकून गेलों होतों अगदीं. पण तिला ना थकवा, ना आळस ! कांहीं वेळानंतर ती जेव्हां परत आली तेव्हां पाहतों तों ती कुठूनतरी पुष्कळसं फराळाचं काय काय घेऊन आली होती. अगदीं निःसंकोचपणानें तिनें त्याचा अर्धा भाग माझ्यापुढें ठेवला, अन् अर्धा भाग स्वतःपुढें घेऊन बसली. अगदीं बरोबर अर्धी अर्धी वाटणी !

"आम्ही आतां खायला सुरुवात करणार इतक्यांत ती पुन्हा उठली. म्हणाली, 'पाणी आणायचं विसरलेंच मी. हं, द्या पाहूं तुमचा लोटा !' अन् मी तो काढून देण्याचीही तिनें वाट पाहिली नाहीं. सरळ आपल्या हातानें तिनें माझ्या सामानांतून लोटा काढून घेतला आणि पाणी आणायला चालती झाली. थोड्या वेळांतच ती परत आली, आणि पाणी खालीं ठेवून, फराळाला बसतां बसतां अगदीं स्पष्ट, सहज शब्दांत ती म्हणाली, 'हें खायचं आणलं आहे ना ? तुमचा द्रोण आहे तीन आण्यांचा. सध्याचे पैसे मी चुकते करून आलें आहें दोघांचेही; पण तुमच्याकडे माझे तीन आणे येणं झालं. तें मग देऊन टाका माझं मला !' तिला ना संकोच, ना भीड, ना शिष्टाचाराचा कांहीं विचार ! सारा कांहीं अगदीं मनःपूत व्यवहार !"

मी मधेंच म्हणालों, "आलं लक्षांत. सारं कांहीं समजून चुकलों

मी सोमेश्वर. जेवढं कांहीं सांगितलं त्यावरून पुढ काय झालं असेल, त्याचीहि कल्पना आली मला. तुमच्या ह्या प्रणय-कथचा प्रारंभ कांहीं वाईट झाला नाहीं ! ”

“ चूक आहे तुमची ! ” सोमेश्वर म्हणाले. “ तुमची कल्पना चुकली. तुम्हाला वाटतं तसल्यापैकीं गोष्टच नाहीं ही ! ”

“ नाहीं ? मग कशी आहे तर ? ”

“ सांगतों, ऐका. ती रात्र तशीच निघून गेली. मला वाटलं होतं, खाणं पिणं झाल्यानंतर मग तिच्याशीं कांहीं वेळपर्यंत गोष्टी बोलत बसेन. तिच्याबद्दलची बरीचशी माहिती मी काढून घेऊं शकेन. तिच्या आयुष्यांत असा बेफाट बेलगामपणा कसा आला त्याचं मूळ शोधून काढता येईल. पण मनांतली इच्छा मनांतच राहिली माझ्या. गोष्टी बोलत बसायची संधि मिळालीच नाहीं. तिच्या कपाळावरचं कुंकू, गळ्यांतलं मंगळसूत्र, ह्यांवरून चारुबालेचं लग्न झालेलं होतं, हें तर स्पष्टच होतं आणि तरीहि तिचं हें असलं जीवन ! ह्यावरून मी मनाशीं एकच निष्कर्ष काढला होता– हिनं नवऱ्याला, किंवा हिच्या नवऱ्यानं हिला टाकलेलं असलं पाहिजे ! आमचा फराळ संपला, आणि तिनें अंथरूण पसरून त्यावर आंग टाकून डोळे मिटून घेतले. अगदीं निश्चिन्त मनानें, पूर्णपणें निर्विकल्प, निर्वेध आणि निर्भयपणानें ती अगदीं स्वस्थ मनानें निजून राहिली, आणि थोड्या वेळांतच ती घोरायलाहि लागली ! ”

“ अरेच्या ! ”

“ दुसऱ्या दिवशीं सकाळीं स्टीमर सुटणार. सरासरीं नऊ वाजण्याच्या सुमारास ती घाटावर लागली. आम्ही दोघेहि बोटी-वर जाऊन बसलों. ह्या अवधींतच चारुबाला पुन्हा कुठें नापत्ता झाली. साऱ्या बोटीभर मी तिला शोधून पाहिलें; पण ती कुठें दिसली नाहीं. शेवटीं मी पुन्हा घाटावर उतरलों. तिचा पत्ता लावायलाच हवा होता ना ! घाटावर उतरून पाहिलें, तिथेंहि ती

कुठें दिसेना ! मनांत नाना तऱ्हेचे तर्कवितर्क सुरू झाले माझ्या. ही पोरगी एकाएकीं अशी नाहींशी तरी कुठें झाली असावी ? का पुन्हा आली कांहीं लहर, अन् निघून गेली आणखी कुठें तरी हो ? कांहीं केल्या मनाला चैन पडेना ! सारखा तिला शोधीत इकडे तिकडे भिरभिर हिंडत होतों आणि अशांतच, घाटाच्या पलीकडच्या टोकाशीं माणसांच्या गर्दीपासून अगदीं दूर ती मला दिसली. तिनें आपली आंधोळ आटोपून घेतली होती, आणि घाटाच्या त्या कोपऱ्यांत आसन मांडून ती डोळे मिटून ध्यान आणि जप करण्यांत तन्मय होऊन बसली होती !"

"काय म्हणतां ?"

"अगदीं पूर्णपणें तन्मय झालेली दिसली मला ती आपल्या ध्यानांत. शेजारीं आजूबाजूला प्रवाश्यांची ही झुम्मड उडालेली. सारखा आरडा-ओरडा अन् कटकट सुरू होती. पण त्या सर्वांचा तिच्या मनाला जणूं स्पर्शसुद्धां होत नव्हता. एकाद्या दगडाच्या कोर-लेल्या मूर्तीसारखी ती बाहेरच्या साऱ्या जगाला पूर्णपणें विसरून आपल्या पूजा-पाठांत मग्न होऊन बसलेली होती. तुमच्यासारखंच मलाहि थोडं आश्चर्य वाटलं तिचं त्या वेळीं. त्या आश्चर्याबरोबरच तिच्याबद्दल एक प्रकारचा आदरहि मनांत उत्पन्न झाल्यावांचून राहिला नाहीं. ती निघून गेलेली नाहीं, इथेंच आहे, ह्या जाणिवेनें आनंद तर झाला होताच !"

"हं."

"थोड्या वेळानें तिचा जप संपला. तिनें डोळे उघडले आणि आपल्या जागेवरून ती उठली. समोर मी उभा आहें हें पाहून तिला कांहींसं आश्चर्य वाटलं. ती म्हणाली, 'हें काय ? तुम्ही इथें कसे ? तुम्ही गेलां नाहींत बोटींतून ?'"

"म्हणजे ? बोट सुटून गेली होती कीं काय ?"

" हो. वेळ झाली तशी सर्व उतारूंना घेऊन बोट निघूनसुद्धां गेली होती."

" अन् तुम्ही ? "

" मी खालीं, घाटावरच राहून गेलों."

" का बरं ? "

" चारुबालेला घेतल्यावांचून जायचं कसं ? "

" मग, बोट सुटायची वेळ होत आली, तशी तिला हांक कां नाहीं मारली ? "

" खरं सांगू ? तिची ती ध्यान--मग्न मूर्ति पाहून तसं कांहीं करण्याची इच्छाच झाली नाहीं मला. मी म्हटलं मनांत, सुटली बोट तर सुटली. कदाचित्, ती केव्हां सुटली तें माझ्या लक्षांतहि आलं नसावं ! "

" आश्चर्य आहे!"

" हं; पण झालं खरं असं ! "

" बरं, पुढें काय झालें ? "

" तिनेंही मला, तुम्ही विचारला तसाच प्रश्न विचारला. ती म्हणाली, 'तुम्ही गेला कसे नाहींत बोटीनें ?' "

" मग ? काय सांगितलं तुम्ही तिला ? "

" काहीं वेळ तर मी कांहींच बोललों नाहीं. तिच्याकडें नुसता पाहातच राहिलों. नुकतंच स्नान केल्यामुळें तिचं तोंड उजळलं होतं. समोरून सूर्याचीं किरणं तिच्या चेहऱ्यावर पडून तो अधिकच उज्ज्वल दिसत होता. माथ्यावरचा कुंकवाचा टिळा अधिकच चमकून उठल्यासारखा भासत होता. तिच्या मुखावरची प्रभा सुकोमल पण पावित्र्यानें मंडित झालेली दिसत होती. तिनें उभें राहून सूर्याला हात जोडून नमस्कार केला आणि पुन्हा तोच प्रश्न उच्चारला, 'तुम्ही गेला कसे नाहींत ?' "

" हं. "

" मी म्हणालों, 'तुमचीच वाट पहात होतों. तुम्हाला घेतल्या-वाचून कसं जायचं ?' ती हंसली आणि म्हणाली, 'अरे वा ! तुमचं साहस कांहीं कमी नाहीं!' "

" काय म्हणाली ती ? साहस कमी नाहीं ? म्हणजे काय? तिला वाटलं तरी काय असं तुमच्याबद्दल, सोमेश्वर ?"

सोमेश्वर म्हणाले, " तुम्ही विचारला तसलाच प्रश्न माझ्याहि मनांत उभा राहिला. तिचं तें बोलणं ऐकून मी विचारलं, ' साहस ? ह्यांत साहसाचा आणि अन् धाडसाचा काय सवाल ? ' ह्यावर तिनें उत्तर दिलं तें एक प्रश्न विचारूनच. तिनें विचारलं, 'नाहीं ना? खात्री आहे ना तुमची ?' मी म्हणालों, 'मला खरोखरीच समजलं नाहीं तुमचं म्हणणं ! जरा अधिक स्पष्ट करून सांगाल तर बरं होईल.' ह्यावर तिनें एकदां डोळे उचलून माझ्याकडे स्थिर दृष्टीनें पाहून घेतले, आणि नंतर किंचित हंसून म्हणाली, ' कांहीं नाहीं. माझीच चूक झाली असं दिसतं आहे. पण तुम्ही माझ्यासाठीं खोळंबा कशाला करून घेतला आपला ? चांगले बोटीवर चढला होतां; एव्हांना अर्धा प्रवास संपवून नदीच्या पैलतीरावर उतरण्याची तयारी सुद्धां सुरू केली असती. उगाच खोळंबा झाला तुमचा. गैबीनाथला जायचं आहे ना तुम्हांला ?' मी म्हटलें, ' मला जायचं आहे, तसं तुम्हांलाहि तिथेंच जायचं आहे, होय ना ? बरोबरच नाहीं का चाललों आपण दोघे कालपासून ?' "

" मग काय म्हणाली ती ? "

" ह्यावर तिनें नुसता हुंकार भरला. कांहीं वेळानंतर मीच म्हणालों, 'बोट तर गेली निघून. आतां पुढें काय ? ' त्यावर ती हंसून म्हणाली, 'गेली तर जाऊं द्या. येईल पुन्हा !' मी म्हणालों, ' पुन्हा, म्हणजे आतां उद्यांवर गेली गोष्ट. ' हें ऐकून ती पुन्हा हंसून म्हणाली, 'अहो, नाहीं.तुम्ही कधीं आलेला दिसत नाहीं ह्या भागांत. ही बोट गेली ना, तीच येईल परत आणखी कांहीं वेळानें त्या पैल-

तीरावरचे इकडे येणारे उतारू घेऊन, अन् पुन्हा आपल्याला घेऊन पलीकडे जाईल. दिवसभर चालतो ह्याच प्रकार. चार-पांच तरी फेऱ्या होतात तिच्या अशा. आपण पहिल्याच फेरींत गेलों असतों, तर पुढच्या प्रवासाची गाडीबैलाची व्यवस्था करायला पलीकडे थोडं सोईचं झालं असतं; पण चला, हरकत नाहीं. मी आहें तुमच्या बरोबर. तेव्हां तुम्हांला कांहीं काळजी नको.' "

" शाबास, सोमेश्वर ! म्हणजे, एकाद्या लहान मुलाप्रमाणेंच ती तुम्हाला वागवायला लागली म्हणायची ! "

सोमेश्वर नुसते हंसले. कांहीं वेळानंतर ते पुढें सांगूं लागले, " हें सारं झालं; पण माझ्या मनांत तिचा तो मघाचा 'साहस' हा शब्द अजूनहि डांचतच होता. तिच्या त्या तसल्या बोलण्याचा एकच अर्थ होऊं शकत होता. तो कोणता, तें कांहीं सांगायलाच हवं असं नाहीं. तुम्हीहि त्याची कल्पना करूं शकतां. "

मी म्हटलें, " मला अगोदरच कल्पना आली त्याची. म्हणूनच तर मला हसायलाहि आलं मघाशीं. "

सोमेश्वर म्हणाले, "माझ्या वर्तनाचा तिनें असा विपरीत अर्थ करावा, ह्याचं मलाहि वाईटच वाटलं होतं. माझ्या स्वतःच्या सभ्य-पणाबद्दल माझी खात्री होती; पण क्षणभर का होईना, तिनें माझ्याबद्दल अविश्वासाची भावना दाखवावी, हा मला माझा अप-मान झाल्यासारखं वाटत होतं. शेवटीं माझ्याच्यानं राहावलं गेलं नाहीं. मनांत जें डाचत होतं, तें उघड-उघड बोलून टाकल्याखेरीज जिवाला स्वस्थता मिळायची नाहीं असं वाटल्यामुळें शेवटीं मी तिला विचारलंच. म्हटलं, 'मघाशीं तुम्ही माझ्याबद्दल जें बोलला त्याचा अर्थ नाहीं सांगितला तुम्ही ? जर माझ्याबद्दल तुमच्या मनांत कांहीं भलती-सलती शंका आली असेल, तर आपली सोबत इथेंच संपवायला हरकत नाहीं ' आणि असें बोलून मी आपलें चंबुगबाळें आटोपून तिथून निघून जायच्याहि तयारीला लागलों. "

मला गंमत वाटत होती तें ऐकून. कुतुहलपूर्वक मी नुसता हुंकार भरून सोमेश्वरांना विचारलें, "पुढें ? "

सोमेश्वर म्हणाले, " मला खरोखरीच वाईट वाटलं आहे हें पाहून तिलाहि वाईट वाटलं. ती घाईघाईनें, पश्चात्तापपूर्वक म्हणाली, "अहो, अहो ! हें काय ? माझी चूक झाली, मघाशींच कबूल नाहीं का केलं मी ? थांबा, चाललांत कुठें ? माझ्यासारख्या वेडीच्या बोलण्याचं इतकं मनाला लावून घेऊं नका तुम्ही ! माझ्यासारख्या बाईमाणसाला असं अर्ध्या वाटेंतच सोडून चालतं व्हायची इच्छा आहे वाटतं तुमची ? वा हो वा ! ' तिची बोलण्याची एकंदर तऱ्हाच अशी दिलखुलास, निष्कपटपणानें भरलेली होती, कीं त्यानंतर माझ्या मनांत कांहीं किंतु शिल्लक उरणंच शक्य नव्हतं. आलेलीं अभ्रं वाऱ्यानें उडून जाऊन आभाळ पुन्हा निर्मळ व्हावं, तसं माझं मन प्रसन्न वाटूं लागलं मला. "

" हं ! "

" कांहीं वेळानें बोट येत असलेली दिसूं लागली. आपली वळकटी माझ्याकडे सारीत ती म्हणाली, ' हं, घ्या एवढं हें सामान. चला, जायला पाहिजे आपण आतां.' "

" मी म्हणालों, अरे वा ! पुरताच हक्क गाजवायला लागली कीं ! "

सोमेश्वर पुढें सांगूं लागले ," बोटींतून आम्हीं नदीचा तो विशाल पाट ओलांडून पैलतीरावर उतरलों. तेथून पुढें बैलगाडीचा प्रवास करायचा होता. त्यासाठीं भाड्यानें बैलगाडी ठरवायची होती. तोंडानें कुठल्याशा स्तोत्राचं पठण करीत चारुबाला पुढें चालली होती आणि सामान डोक्यावर लादून मी तिच्या मागोमाग जात होतों. "

" छान ! "

माझ्या उद्गाराकडे मुळींसुद्धां लक्ष न देतां, सोमेश्वर पुढें सांगूं लागले, " मी चाललों होतों तिच्या मागें. कांहीं अंतरावर भाड्याच्या गाड्यांचा अड्डा दिसला. आमच्या अगोदर आलेल्या उतारूंनीं बहुतेक

गाड्या अगोदरच नेल्या असाव्या; कारण आम्हाला त्या ठिकाणीं गाड्या आढळल्याच नाहींत. मोठ्या प्रयासानंतर एक गाडी जेमतेम सांपडली. भली मोठी होती ती आणि गाडीवाल्याचं म्हणणं होतं, पुरे बारा लोक भाडेकरू मिळाल्याखेरीज कांहीं आपण गाडी सोडणार नाहीं. आमच्या अगोदरच कांहीं माणसं त्या गाडींत जागा धरून बसलीं होतींच. इतक्यांत आम्ही दोघे त्यांत जाऊन सामील झालों. आणखी कांहीं लोक आले. गाडीवाल्याची बारा माणसांची संख्या पूर्ण झाली. तरी तो गाडी जोडण्याचं कांहीं लक्षण दिसेना. इतर उतारू चुळबुळ करूं लागले; पण गाडीवाल्याला बोलायला कोणीच तयार होईना. परंतु चारुबाला मात्र त्यांपैकीं नव्हती. तिनें एकदम गाडीवाल्यावर आपल्या तोंडाचा पट्टा सुरू केला. खरंच सांगतों तुम्हांला, तिच्यासारखी चंचल, अधीर प्रकृतीची स्त्री मी आजन्मांत कुठें पाहिली नाहीं. डाव्या हातानें कपाळावर आलेले केस मागें सारीत ती ओळखी, अनोळखी सर्वच माणसांशीं गप्पा-गोष्टी अगदीं निःसंकोच भावानें सुरू करून देई. थट्टा-मस्करी, हास्य-विनोद, कशाला कांहीं उणें नसे तिच्या बोलण्यांत. त्या गाडींत बरे-चसे उत्तर हिंदुस्थानकडचे लोक होते, बायका होत्या, तसे पुरुषहि होते. त्याच्याप्रमाणेंच अगदीं शुद्ध हिंदी भाषेंत तिनें ज्या कांहीं गंमतीच्या गोष्टी त्यांच्याशीं केल्या म्हणतां, ते लोक अगदीं पोट धरून हंसतां हंसतां गाडींत जागच्या जागीं लोळायला लागले अक्षरशः! प्रत्येकाशींच तिचं वागणं, बोलणं-चालणं जसं सहजगत्या, तसंच स्वच्छंद अन् मनमोकळं ! ”

मी म्हटलं, “मला कल्पना आहे असल्या माणसांच्या स्वभावाची. ज्यांच्यांत सेल्फ कॉन्शसनेस नसतो ना, तीं माणसं अशींच असतात. जिथें जातील तिथें तीं एकदम पॉप्युलर होऊन जातात. ”

सोमेश्वर म्हणाले, “ हं. त्यांतून ती पडली स्त्री. पुन्हा तरुण अन् देखणी ! पण म्हणून कोणी कांहीं अवास्तव फायदा घेईल तिच्या

मोकळेपणाचा ? नांव नका घेऊं ! तिनें त्या गाडीवाल्याची अशी हजिरी घेतली म्हणतां कीं तोहि थक्कच होऊन गेला !'

मी विचारलं, " काय म्हणाली ती त्याला ? "

सोमेश्वर म्हणाले, " अहो, म्हणायचं काय ? गाडीची भरती पुरी होऊन गेली. आम्हाला उशीर व्हायला लावला. तरी तो प्राणी कांहीं गाडीला बैल जुंपायचं नांव काढीना. इतर माणसांनीं कसाबसा हिय्या करून त्याला एकदांदोनदां सुचवूनहि पाहिलं; पण तो आपला एक नाहीं कीं दोन नाहीं. जातीचा आडदांड पुरभैय्या पडला तो ! तो काय आम्हाला दाद देतो ? शेवटीं चारुबाला उठली. फणकाऱ्यानें गाडींतून ती खालीं उतरली, अन् त्या माणसाला अस्खलित हिंदींत म्हणाली, ' क्यों जी, तुम्हें गाडी जोतना है या नहीं ? हम लोक कब तक बैठे रहेंगे इसी तरह ?' तिला हिंदींत बोलतांना पाहून तो थोडासा चरकला खरा. पण आपला आडमुठेपणा न सोडतां तो म्हणाला, ' हांऽऽ ! चलेंगे ! जल्दी काहेकी है ?' आणि तो लागला चिलमीचे झुरके मारायला. तें पाहून चारुबाला आणखीच चिडली. रागानें डोळे लाल करून ती म्हणाली, ' हम नहीं जायेंगे तुम्हारी गाडीमें ! तुम क्या समझते हो, हमारे वक्त की कोई किमत ही नहीं ? तुम नहीं, तुम्हारा भाई दूसरा ! ऐसी बीसों गाडियाँ मिल जायेगी हमारे लिये. पैसा ले रहे हो, कुछ मुफ्त में तो ले नहीं जा रहे हो हमे ? हमारे पास पैसा रहने पर छप्पन गाडीवाले दौड आयेंगे ! तुम क्या समझ रहे हो ?' असें म्हणून तिनें आपले ओले कपडे अन् बिछाना काखोटीला मारला, आणि लागली चालायला !'

मी म्हटलें, " शाबास !"

सोमेश्वर पुढें सांगूं लागले, "तिला तशी जायला निघालेली पाहून गाडीवाला एकदम शुद्धीवर आला. गयावया करीत तो तिच्या मागें धांवला, पुष्कळ हाता-पाया पडून, विनवण्या करून तो तिला परत

घेऊन आला, आणि मग एका मिनिटाचाहि विलंब न करतां त्यानें गाडी जोडली.''

मी म्हणालों, "हे लेकाचे पुरभैय्यें असतातच असे नाठाळ. त्यांना कोणी शेराला सव्वाशेर भेटला कीं एकदम नाकदुऱ्या काढायला लागतात बेटे ! नाहींतर बसतात डोक्यावर ! बरं, मग काय झालं? "

सोमेश्वर म्हणाले, "गाडी चालू झाली, तसं तिनं आपलं ओलं लुगडं घेतलं, अन् जिकडून ऊन येत होतं त्या बाजूनें गाडीच्यावर टाकून दि . म्हणते कशी, असे टकमक पाहत कायरा हिला माझ्या तोंडाकडे ? जरा नीट, सरळ बसा कीं सरून ! "

मी म्हटलं, "चांगल्याच बोलभांड बाईच्या तावडींत सांपडला होता तुम्ही सोमेश्वर ! "

ते म्हणाले, "नुसती बोलभांडच ? अहो, जशी ती वाचाळ, तशीच बेदरकारही अन् अमर्यादहि ! ना तिला कोणाची भीड-मर्यादा, ना शिष्टाचाराचा विचार! मधून-मधून तिच्या तोंडावाटे बाहेर पडणाऱ्या असभ्य, अभद्र गोष्टी ऐकल्या कीं माझं पित्त खवळून उठत असे. केवळ बायकोची जात म्हणूनच मी तिच्या त्या तसल्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलं, एवढंच. बायकांच्या जातीची जन्मजात नम्रता, लाजलज्जा, हेंच त्यांच्या मनाचं खरं सौन्दर्य असतं. पण तें तिला शिवूनसुद्धां गेलं नव्हतं ! अशी उद्धट, निर्लज्ज स्त्री मी जन्मात दुसरी पाहिली नाहीं. खरोखरीच, उच्छृंखल स्त्री किती भयानक वस्तु असते !"

मी म्हणालों, " खरं आहे अगदीं. बरं, पुढें काय झालं ? "

सोमेश्वर म्हणाले, "सरासरी दोन अडीच तासांनीं आमची गाडी अष्टभुजेच्या देवस्थानाशीं येऊन दाखल झाली. इथें आम्ही गाडींतून खालीं उतरलों. येथून पुढें डोंगराळ पाऊलवाटेनें पायीं प्रवास करायचा होता. अष्टभुजा देवीच्या मंदिराजवळच, पली-

कडच्या बाजूला एक भला मोठा आश्रम होता. त्या आश्रमांत बरे-चसे संन्यासी घर-संसार सोडून तपश्चर्या करीत रहात असत. चारु-बाला गाडींतून खालीं उतरली आणि म्हणाली, " 'या, चला माझ्या-बरोबर. दाखवून देतें तुम्हांला. इथें माझे गुरुमहाराज राहातात. स्वामीजीचं दर्शन करणार ना ?' मी उत्तर दिलं, ' नको ! मी नाहीं येत. मी थांबतों इथेंच. तुम्ही या जाऊन तुम्हाला कुठें जायचें असेल तिथें.' "

मी थट्टेच्या स्वरांत म्हणालों, " कां हो, नको कां म्हणाला ? जायचं असतं तिच्याबरोबर. अनायासें तिच्या गुरुमाउलीचं दर्शन घडलं असतं तुम्हाला. तेवढंच पुण्य पदरांत पडलं असतं ! नको कां म्हणालांत ? "

सोमेश्वर रुक्ष स्वरांत म्हणाले, " तुम्हाला तर ठाऊक आहे, मी कोणत्या जातीचा माणूस आहें तें. ह्या म्हातारपणांतहि माझ्या हातचा दारूचा पेला सुटला नाहीं, तो मी त्या वयांत असल्या गोष्टींच्या फंदांत पडणार ? "

मी विचारलें, " पण तिनं, तुमच्या त्या चारुबालेनं, बरं सोडलं तुम्हाला मोकळं ? "

सोमेश्वर म्हणाले, " कदाचित् तिनं सोडलंहि नसतं मला. पण झालं काय, कीं नेमक्या त्याच वेळीं समोरून तीन–चार संन्यासिनी बाया चालल्या होत्या, त्यांच्याकडे चारुबालेचं लक्ष गेलं आणि त्या-सरशीं ती एकदम त्यांच्यांत जाऊन मिसळली. त्या सर्व बाया तिच्या पूर्वीपासूनच्या चांगल्या ओळखीच्या असाव्या. कोणाला काकी, कोणाला मामी, कोणाला आत्या अन् कोणाला आजी म्हणून तिनें हंसत हंसत मोठमोठ्यानें हांका मारायला सुरुवात केली आणि म्हणाली, ' हें कोण, सनतची आई का ग ? अन् ही मोठी आत्या पण दिसत आहे. तुम्ही सख्याजणीहि आलेल्या दिसतां ! छान ! बरं झालं बाई, भेटी झाल्या ! ह्या बाजूनेंच चाललें होतें. तेव्हां

म्हटलं, जातां–जातां गुरुमाऊलीचंहि दर्शन घ्यावं अन् मग पुढें जावं. तुम्ही साऱ्याजणी तिकडेच निघालांत वाटतं ? होय ना ? चला तर मग, जाऊं या आपण !'"

मी म्हणालों, "पाहिलं ना ? मला वाटलं होतं तें कांहीं खोटं नव्हतं. तुमची ती चारुबाला ह्या प्रांतांत चांगलीच रुळलेली, सर्वांच्या ओळखीची होती.'

सोमेश्वर म्हणाले, "ती तर होतीच. ज्या बायांना उद्देशून ती बोलत होती, त्यांचंहि लक्ष तिच्याकडे गेलं, तशा त्या आपापसांत हंसत म्हणायला लागल्या, 'अग बाई ! ही वेडपट पुन्हा इथें कुठून येऊन पोहोंचली ? काय ग, ए बये ! कपाळाच्या कुंकवाचा मळवट अजूनहि तसाच कायम आहे तुझा ! अजूनहि डोकं ताळ्यावर नाहीं आलं तुझं ना ? किती वर्षं झालीं ? आं ? ' चारुबाला ह्या अवकाशांत त्यांच्यांत जाऊन मिसळली होती. त्या सर्वजणी मिळून त्या आश्रमाच्या रोखानें चालूं लागल्या. मी रस्त्याच्या कांठाशीं उन्हाचे चटके सोशीत उभा होतों."

मी म्हटलं, "ती सुद्धां त्यांच्या बरोबर निघून गेली ? अन् जाण्यापूर्वी तिनें तुमची विचारपूससुद्धां केली नाहीं ?"

सोमेश्वर म्हणाले, "अहं ! त्या बाया तिला दिसल्या, आणि मग ती बाकीच्या साऱ्या गोष्टी अजीबात विसरूनच गेली एका क्षणात ! माझ्याकडे लक्ष द्यायला तिला अवकाश कुठें होता ? ह्यापूर्वींसुद्धां मीच स्वतःला तिच्यावर लादीत आल्यासारखं करीत होतों. तसा मी, माझं अस्तित्व तिच्या खिसगणतींत होतंच कुठें ? रस्त्यानें जातां जातां एकादा धुळीचा कण किंवा गवताचं पातं-बितं माणसाच्या अंगाला जाऊन बिलगतं; पण वेळ आली कीं माणूस तें झटकून टाकून अंगावेगळं करून टाकतं, त्याला त्याच्या आयुष्यांत एक अनाहूत, अगांतुक अडगळ म्हणूनच जें कांहीं स्थान असेल तेंच !

तशीच, मला वाटतं, तिची माझ्या बाबतींत वृत्ति होती. मीच लोचटपणानें तिला चिकटून राहण्याचा प्रयत्न करीत होतों आपला ! ”

मी म्हटलें, “ मग आतां सारं कांहीं स्पष्ट कबूलच करून करून टाका ना सोमेश्वर ! ”

सोमेश्वर म्हणाले, “ सांगतों ना ! अगदीं स्पष्टच सांगतों सारं. मला तिच्याबद्दल अपार आकर्षण वाटायला लागलं होतं, एक प्रकारचा जबरदस्त मोह उत्पन्न झाला होता, हें अगदीं खरं आहे. तें आकर्षण, तो मोह किती प्रबळ होता, तें मी सांगूनहि तुम्हाला समजणार नाहीं. तिच्यासाठीं मी आपलं सर्वस्व देऊन दिवाळखोर बनल्यासारखा होऊन गेलों होतों, खरं आहे. पण त्याबरोबरच, त्या आकर्षणाची जातहि अगदीं वेगळी होती, हें विसरूं नका. त्यांत रोमान्स नव्हता, प्रेम नव्हतं, लालसा नव्हती, वासना नव्हती ! तें आकर्षण होतं एक जबरदस्त इल्यूझन, एक दुःस्वप्न ! ”

सोमेश्वरांनीं आपल्या मनःस्थितीचं केलेलं हें विवेचन समजून घेण्याचा मी प्रयत्न करीत होतों.मी विचारलें, “ती त्या बायांबरोबर निघून गेली, त्यानंतर तिची तुमची भेट झालीच नाहीं का पुन्हा?”

ते म्हणाले, “ झाली ना ! त्यानंतर थोड्याच वेळानंतर ती मला पुन्हा भेटली. मी मनांत म्हणत होतों, इथंच उन्हांत असं किती वेळ तिष्ठत उभं रहायचं ? ती गेली. पुन्हा परत केव्हां येईल, येईलच कीं नाहीं, त्याचा काय नियम ? त्यापेक्षां आपणच हळू हळू वाट चालायला सुरुवात करावी, आलीच तर येईल मागाहून, भेटेल पुन्हा, असा विचार करून मी चालूं लागलों. पण थोडं अंतर चालून गेल्यानंतर जें दृश्य मला दिसलं, तें पाहून मी आश्चर्यानें हतबुद्धच होऊन गेलों ! ”

“ असं काय दिसलं बुवा तुम्हाला ?”

“ पलीकडे आश्रम होता, धर्मशाळा होती, आणि तिच्या कडेनें च पाऊलवाट जात होती. धर्मशाळेशीं मी येऊन पाहतों, तों चारुबाला !

पडवींत बसली आहे, अन् ढसढसा रडते आहे ! तिच्या रडण्याचाहि प्रकार कांहींसा निराळा होता. तिथें नव्हतें उच्छ्वास्, नव्हते हुंदके कीं नव्हतं ओरडणं ! नुसते डोळ्यांवाटे अश्रु वहात होते ! आतां मी म्हातारा झालों आहें. आतांची गोष्ट सोडा. पण त्या वेळीं मी तरुण होतों. तरुणपणीं स्त्रीच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिलेले सहसा कोणाला पाहवत नाहींत. मलाहि तें दृश्य सहन झालं नाहीं. माझं हृदय ममतेनें भरून गेलं. मी तिच्याजवळ गेलों अन् विचारलं, 'काय झालं तुम्हाला ? आत्तां तर आपण बरोबर होतों. तोंपर्यंत अगदीं मजेंत होता तुम्ही. अन् ह्या दहा-पांच मिनिटांतच असं काय झालं विशेष ? कशाचं रडूं आलं तुम्हाला ?' "

" काय म्हणाली ती ह्यावर ? "

" ती म्हणायला लागली, ' तुम्ही जा, जा इथून. कोणालासुद्धां माझं तोंड दाखविण्याची इच्छा नाहीं माझी ! जा तुम्ही !' आणि असें म्हणत तिनें आपलं तोंड दोन्ही हातांनीं झाकून घेतलं, अन् जमिनीवर उपडी पडून ती रडूं लागली. तिचं सारं शरीर हादरत होतं त्या रडण्यामुळें. "

" अरेच्या ! पण, तिला झालं होतं तरी काय असं रडायला ?"

सोमेश्वर सांगूं लागले, " तिनें मला सांगून टाकलं होतं खरं निघून जायला. पण तिला सोडून मी जाणार कुठें ? विशेषतः ती तिची तशी अवस्था पाहिल्यानंतर तर माझं तिला रडत टाकून जाणं अशक्यच होतं. माझं सर्वस्वच तर मी हरवून बसलों होतों त्या वेळीं ! कांहीं न बोलतां मी तिच्या पायाजवळ स्तब्धपणें उभा राहिलों. मी गेलों नाहीं, तिथेंच आहें, ह्याची जाणीव तिला देखील असावी. कांहीं वेळानंतर अभिमानानें आणि आसवांनीं दाटलेल्या स्वरांत ती म्हणाली, 'आतां माझं नांव सोडा. मला कोणत्याहि गोष्टी-बद्दल, कशाचाहि आग्रह करूं नका, कीं माझं मन बदलण्याचा प्रयत्न प्रयत्न करूं नका. आतां मी हें ठिकाण सोडायची नाहीं. इथें अशीच

मरेपर्यंत बसून राहीन अन् प्रायश्चित्त घेईन ! ज्यानें त्यानें माझा अपमान करावा, एवढी मी हीन आहें ? एवढी क्षुद्र आहें मी ? गुरुदेवांची जेवायची वेळ होती, म्हणून मला कोणी त्यांचं दर्शन घ्यायला सुद्धां आंत जाऊं देईना ! म्हणे कोष्टयाची पोरगी ! असेन मी कोष्टयाची मुलगी ! म्हणून काय झालं ? मी म्हणतें, हो, आहें मी कोष्टी जातीची ! मी कोष्टी, मी चांडाळ, मी डोम, मी मांग, मी '. . . . "

आतां आलं माझ्या लक्षांत, तिला एवढं वाईट कशाचं वाटलं होतं तें.

सोमेश्वर पुढें सांगत होते, " असंच बेभानपणें ती बडबडत होती, आणि रडत होती. अत्यंत आवेगानें ती आणखीहि पुष्कळ बोलली. म्हणाली, ' मी खालच्या जातीतली आहें हें आज कळलं मला, चांगलं कळून चुकलं. आतां नाहीं कधीं विसरणार. मी नीच आहें, हीन जातीची आहें ! मोठेपणा जो काहीं असेल तो सारा तुमच्याजवळ ! मान-मान्यता, आदर-सत्कार जो कांहीं व्हायचा तो फक्त तुमचा ! मी तर केवळ नीच कोष्टी !' "

" बराच वेळपर्यंत ती अशीच रडत पडली होती. कांहीं वेळानंतर ती उठून बसली. तिनें आपले डोळे पुसले, तोंडावरून हात फिरविला, आणि मनाचा कांहीं तरी निश्चय करून तिनें आपलें गाठोडें उचललें व उठून चालायला लागली. मी एक दोनदां मध्येंच तिच्याशीं बोलण्याचा प्रयत्न केला ; पण माझ्याकडे तिचें लक्षच नव्हतें. इकडे-तिकडे कुठेंहि न पाहतां, डाव्या हातानें आपल्या तोंडावर आलेले केंस मागें सारीत ती झपाट्यानें चालूं लागली. तिसऱ्या प्रहरचं प्रखर ऊन चोहोंकडे पसरलं होतं. अंगाला चटके बसत होते. पण तिचं कशाकडेच लक्ष नव्हतं.

" थंडीचे दिवस संपले होते. ती झपाझप पावलें उचलीत चालली होती, आणि मी तिच्या मागें मागें जात होतों. काहीं अंतरावर

डोंगरांतून वहात येणारी एक नदी आडवी आली. पाणी फारसं खोल नव्हतं. अगदीं सहजच आम्ही ती ओलांडून पलीकडे गेलों. आतां चढण सुरू झाली होती. जसजसे आम्ही पुढें जात होतों, तसतसा मार्ग अधिकाधिक कठीण होत चालला. पण तिला त्याचं कांहींच वाटत नसल्यासारखं दिसत होतं. ती आपल्याच तंद्रींत चालली होती. तिनें एकदांसुद्धां मागें वळून माझ्याकडे पाहिलं नाहीं. मी तिच्या बरोबर येतों आहें, ह्या गोष्टीची तिनें दखल देखील घेतली नाहीं. माझ्या अस्तित्वाची, सोबतीची, कशाचीच जणूं तिला कांहीं पर्वा वाटत नव्हती, किंमत वाटत नव्हती. शेवटीं मीच कंटाळलों, तिचा नाद सोडून दिला आणि हळूं हळूं आपल्या गतीनें मी चालूं लागलों."

मी म्हटलें, "चला, बरं झालं. तुमच्या डोक्यावरचं हें भूत उतरलं, कांहीं वाईट झालं नाहीं, सोमेश्वर !"

ते म्हणाले, "हो, भूतच उतरलं, कांहीं खोटं नाहीं. डोंगराला कधीं वळसा देत, कधीं वर, तर कधीं खालीं पाऊलवाट जात होती आणि त्या पाऊलवाटेवरून चारुशीला झपाट्यानें चालली होती. आतां ती पुष्कळ पुढें निघून गेली होती एका वळणावर आल्यानंतर मी पाहिलं, एवढी चढण चढून आल्यानंतरहि तिच्या गतींत कोणताहि फरक पडला नव्हता. मी एक-दोनदां मधें दम घेण्यासाठीं थांबलों तरी होतों. पण तिचा प्रवास आपला चालूंच होता. ना तिला थकवा, ना कांहीं. इकडे तिकडे न पाहता तिचं आपलं नाकासमोर चालणं सुरूच होतं. जणूं काय, सतत चालत राहण्याची नशाच चढली होती तिला ! मी हरलों तिच्यापुढें !"

मी म्हणालों, "संपली वाटतं इथें तुमची गोष्ट ?"

सोमेश्वर म्हणाले, "संपली असती, तर बरं झालं असतं. पण ती संपली नाहीं. पुढचा भाग सांगायला अन् समजायलाहि सोपा आहे."

मी म्हटलं, " अद्यापपर्यंत सांगितलं तेंहि समजायला कठीण होतं असं नाहीं सोमेश्वर ! "

ते म्हणाले, " कोणाला ठाऊक ? "

मी कांहींसें आश्चर्यानें म्हटलें, " म्हणजे काय ?"

ते म्हणाले, " म्हणजे असं कीं तरुण स्त्री आणि तरुण पुरुष ह्यांच्याबद्दल गोष्ट आली कीं त्याचा एकच विशेष प्रकारचा अर्थ असू शकतो, अशी एक विचित्र धारणा सर्वसाधारणपणें लोकांची झालेली असते. त्यापेक्षां काहीं निराळी वस्तुस्थिति असल्याचं जर कोणी सांगायला लागलं, तर एक तर तो खोटें बनवून सांगतो आहे असं ऐकणाऱ्याला वाटायला लागतं, किंवा त्याच्या शब्दांतून ध्वनितहि न होणारे अर्थ अन् आशय त्याच्या पदरांत टाकून, ऐकणारे म्हणायला लागतात, ह्याचाच अर्थ तो ! ह्यालाच बिचाऱ्याला कळलं नाहीं ह्याचं मन कसं होतं तें. शिवाय, असे प्रसंग, त्याचा अर्थ अन् आशय विकृत स्वरूपांत पुढें येऊन उभे राहूं नयेत म्हणून, यथातथ्य स्वरूपांत सांगायलाहि तेवढेसे सोपे नसतात. ही भाषा आहे ना ! ती कांहीं आंतल्या साऱ्याच गोष्टी सरळ स्वरूपांत मांडायला समर्थ असतेच असं कांहीं नाहीं. सांगणाऱ्याच्या मनांत असतं एक. तो सांगतो त्यांतून तें कितपत प्रगट होऊं शकतं, भगवान जाणे ! अन् मग त्याबद्दल आपापल्या धारणेप्रमाणें समजुती करून घेऊन ऐकणारे ! ह्या साऱ्या भानगडींत बिचारं सत्य कुठच्या कुठें गुदमरून पडल्यासारखं होऊन जातं. "

" अरेच्या ! तुम्ही तर साहित्य-शास्त्रावरच झोड उठवायला सुरुवात केली : पुढें काय झालं तें सांगा ना !"

सोमेश्वर म्हणाले, "ऐका ! पुढचा भाग अस्खलितपणें झुळझुळ वाहणाऱ्या झऱ्यासारखाच आहे अगदीं. पांच-सात मैलांचा कठिण डोंगराळ मार्ग चालून संध्याकाळच्या सुमारास मी एका नदीच्या काठाशीं येऊन पोहोंचलों. शरीर अगदीं थकून गेलं होतं. सूर्यास्त

होऊन गेला होता. थंडीहि पडूं लागली होती. समोरच एक लहा-नशी धर्मशाळा दिसत होती. पण तिथें जाऊन पाहिलें, तर यात्रे-करूंची नुसती एकच गर्दी झालेली. पाय ठेवायलाहि जागा मिळणं-दुरापास्त होतं. मग रात्रीपुरता मुक्कामाचा तर प्रश्नच नाहीं. नदीच्या कांठाशीं पुष्कळशा लहान--लहान झोंपड्या बांधून ठेवलेल्या होत्या-पाना--पाचोळ्यांच्या छपरांच्या, ऋषीमुनींच्या आश्रमांसारख्या ! त्यांपैकीं एकाद्या आश्रमात जागा मिळेल म्हणून प्रयत्न करून पाहिला; पण गर्दीमुळें तिथेंहि कुठें सोय झाली नाहीं. इकडे-तिकडे यात्रेकरू चुली मांडून स्वयंपाकाच्या तयारीस लागलेले होते. जरा लौकर पाय उचलून जर मी थोडा आधीं इथें येऊन पोहोंचलों असतों, तर कदा-चित् मला जागा मिळून गेली असती एकाद्या कोपऱ्यांत. पण आतां तें कांहीं शक्य दिसेना. शेवटीं नदीच्या कांठच्या चढणीजवळच कुठें तरी, बरीशी जागा पहावी अन् रात्रीपुरतं तिथें उघड्यावरच अंग टाकावं, अशा विचारानें मी त्या बाजूला पाय वळविले. इतक्यांत शेजारच्या झोपडींतून चारुबालेच्या तोंडचे शब्द माझ्या कानीं पडले. ती मलाच उद्देशून म्हणत होती, ‘ आलात ? बरं झालं. या, आंत या. दुसरीकडे कुठें जागा मिळाली नाहीं वाटतं ? मिळाली नाहीं, तें तर दिसतंच आहे. इतका उशीर झाला येऊन पोहोंचायला ! मग जागा कशी मिळणार ? पण, तुम्हांला एवढा उशीर कसा लागला ? दमलेलेहि दिसतां फार ! पायीं चालायची संवय नाहीं ना तुम्हांला. म्हणूनच फार त्रास झाला तुम्हाला, खरं ना ?’ ”

मी म्हणालों, “ अरे वा ! पुन्हा पूर्वपदावर आली ती ! ”

सोमेश्वर म्हणाले, “ दुपारचं तिचं तें तसं वागणं, आणि त्यानंतर आतांची ही अशी प्रेमळपणाची विचारपूस आणि कळकळ ! मला तिचं बोलणं ऐकून आश्चर्य तर वाटलंच, पण थोडी भीतीहि वाट-ल्यावांचून राहिली नाहीं. तिच्या कोणत्या शब्दावर विश्वास ठेवावा, तें मला कळेना.एकदां मनांत आलं म्हणजे मोठ्या अगत्यानें माणसाला

जवळ करायची, अन् पुन्हा मनांत आलं कीं त्याला दूर लोटायलाहि मागेंपुढें पहायची नाहीं. असल्या लहरी स्वभावाच्या माणसाचा काय भरंवसा ? पण रात्रीपुरती जागा तर मला हवीच होती. दिवस-भरच्या पायपिटीमुळें थकून गेलों होतों अगदीं. शेवटीं थोडासा निर्लज्जपणा पत्करून मी विचारलेंच तिला. म्हटलं, 'इथें जागा मिळेल का माझ्यापुरती ?'

" ती म्हणाली, 'मिळेल का म्हणजे काय ? मिळायलाच हवी. नाहींतर असल्या रात्रीच्या अंधारांत दुसरीकडे जाणार कुठें तुम्ही ? ह्या झोंपडींतहि गर्दी आहेच. कांहीं नाहीं तरी, वीसच्या वर माणसं असतील. पण तुमच्यापुरती जागा मिळेल इथें. ह्या इथें, कोपऱ्याशीं तो खुंटा आहे ना, त्याच्या पलीकडे तुमची जागा. बरं, खाणं पिणं, कांहीं झालं का ?काय केली त्याची सोय ?' मी काय उत्तर देणार? म्हटलं, 'अजून तरी काहीं विचार केला नाहीं त्याबद्दल. पाठ टेका-यला जागा मिळाली ! आतां पाहीन. कुठें तरी तीन दगड मांडून घेईन शिजवून कांहीं तरी' असें म्हणत मी आंत शिरलों. झोंपडींत माणसांचा गोठा झाला होता नुसता. त्या गर्दीतून वाट काढीत कसातरी मी आपल्या जागेवर जाऊन पोहोंचलों, आणि खांद्यावरची पडशी खालीं ठेवीत तिला विचारलें, 'तुमच्या जेवण्याखाण्याचं कसं काय ?'

" ती म्हणाली, 'त्याची व्यवस्था झाली आहे. ते पहा बाहेर महाराज चुलीशीं तेंच करीत बसले आहेत.'

"मला आश्चर्य वाटलं. विचारलं, 'हे महाराज कोण आणखी ?'

"माझा प्रश्न ऐकून चारुबाला खळखळून हंसली. सारी झोंपडी तिच्या हंसण्यानं दुमदुमून गेली. ती सांगायला लागली, 'हे महाराज माझे नवीन मित्र आहेत. आजच ओळख झाली त्यांच्याशीं. रस्त्यानें येत होतें त्याच वेळीं अचानक भेट झाली. तेहि त्याच वाटेनें चालले होते. भारीच विनयशील अन् नम्र स्वभाव आहे बिचाऱ्याचा. रस्ता-

भर असं कांहीं गोड बोलत होते ते माझ्याशीं. बायकोची जात ! माझं मन एकदम आनंदानें भरून गेलं ! म्हटलं, अशा भल्या माणसाची सोबत मिळाली, कांहीं वाईट नाहीं. रस्ता जरा बिकटच आहे म्हटलं, तेव्हां बरोबर पुरुष माणूस असलेला बरा आपला !' असें म्हणून ती त्या महाराजाला हाक मारायला लागली, 'महाराज, अहो महाराजजी ! ऐकलंत का ?' "

मी म्हणालों, "वाटली होती तशी पोरगी खरोखरीच वेंधळी दिसत नाहीं एकूण ! "

सोमेश्वर तिकडे दुर्लक्ष करीत म्हणाले, "बाहेर अंधार झाला होता. झोंपडीच्या पलीकडे उघड्यावर जिथें चूल मांडून स्वयंपाक तयार होत होता, तिकडून, जाड–जूड गुरुगंभीर स्वरांत उत्तर आलें, 'क्यों जी ? क्या कहती है ?' चारुबाला त्याला म्हणाली, 'खिचडी चुल्हेपर चढ गयी, महाराज ?' त्यानें उत्तर दिलं, 'जी हां ! चढ चुकी खिचडी !'

"हें ऐकून ती माझ्याकडे वळली आणि हंसून म्हणाली, 'पाहिलंत ना, कितो निःस्वार्थीपणानं बिचारा खपतो आहे माझ्यासाठीं ! असला परोपकारी माणूस पाहिला होता कधीं ? बिचाऱ्यानें पाणी भरून आणलं माझ्यासाठीं, स्वयंपाक तर करतो आहे तें पाहतांच आहांत तुम्ही. सारा रस्ताभर भजनं म्हणत माझी करमणूक करीत होता बिचारा. मला कशाचाहि इतकासुद्धां त्रास होऊं नये, ह्यासाठीं किती लक्ष आहे त्याचं ! ज्याच्यांत मला बरं वाटेल, तेंच करण्याची सारखी खटपट करीत असतो बिचारा ! पण तें जाऊं द्या. तुम्ही आतां कशाला बसून राहिलांत ? उठा, अन् आपलं खाणं-पिणं उरकून घेण्याच्या तयारीला लागा. त्या धर्मशाळेंत भांडीं-कुंडीं मिळतातच. रखवालदाराकडून तीं आणायचीं. कणीक–तांदूळ वगैरेहि सामान हवं असलं तर तिथें मिळूं शकतं. उठा, अन् चूल मांडून पोटापाण्याची

व्यवस्था करा. चार घांस पोटांत गेले म्हणजे बरं. आज सबंध दिवसच तर उपास घडला तुम्हांला. आतां उशीर करूं नका आणखी."

सोमेश्वर हकीकत सांगत होते आणि त्यांच्या तोंडून चारुबालेनें सांगितलेला तो महाराजाबद्दलचा वृत्तांत ऐकून मला खूप गंमत वाटत होती. हंसत हंसत मी म्हणालों, "म्हटलं तें कांहीं खोटं नाहीं सोमेश्वर ! तुमची ती चारुबाला अर्धवट अन् वेडपट आहे असं म्हणणारेच वेडपट ठरले असते ! माणसाची ओळख तिला पक्की होती. एवढंच नाहीं, तर कोणाचा कसा उपयोग करून घ्यायचा, त्याचंहि तारतम्य तिच्यात भरपूर होतं असं दिसतं ! वस्ताद दिसते पोरगी !"

सोमेश्वर पुढें सांगूं लागले, "धर्मशाळेंतून मी भांडींकुंडीं आणलीं, आणि पोटाच्या उद्योगाला लागलों. थंडीची वेळ. डोंगराळ मुलुख. रात्रीची वेळ. अशा परिस्थितींत अंधारांत बाहेर राहून सारं कांहीं करणं म्हणजे मोठा प्रश्नच होता. पण उपाय नव्हता. पोटांत भुकेनें काहूर मांडलं होतं. त्या ज्वालेपुढें साऱ्या अडचणी तुच्छ वाटायल्या लागल्या. मी लाकडें आणलीं, दगड मांडून चूल तयार केली आणि विस्तव पेटवायचा प्रयत्न करूं लागलों. पण कांहीं केल्या चूल पेटण्याच लक्षण कांहीं दिसेना. लाकडं अगदीं थंडगार ! पेटण्याची त्यांची इच्छा नव्हती जशी कांहीं. फूऽऽ फूऽऽ करून हैराण झालों मी अगदीं; पण कांहीं मात्रा चालेना. ह्या अवधींत महाराजांचा स्वयंपाक तयार झाला होता. शिजवलेल्या अन्नानें भरलेलीं भांडीं घेऊन ते झोपडींत शिरले. आतां कुठें कंदिलाच्या उजेडांत त्या माणसाचा चेहरा मी स्पष्टपणें पाहूं शकलों.वय असेल त्याचं पन्नास ते सत्तराच्या दरम्यान. डोक्यावर टक्कल पडलेलं. गळ्यांत तुळशीची माळ. सारा चेहरा दाढी-मिशांच्या जंजाळांत गुरफटलेला. डोळे चेहऱ्याच्या मानानें लहान. उघडा भप्प गव्हाळी रंग. त्यांत तांबूस वर्णाची छटा. तो आंत आला, आणि नीट काळजीपूर्वक त्यानें हातातील भांडीं

चारुबालेच्या शेजारीं ठेवली. त्या वेळीं ती आपलें कांबळें अंथरून त्यावर आरामानें इतर यात्रेकरूंशीं गप्पा मारीत सुखांत बसली होती. महाराजांकडे पाहून ती त्याला म्हणाली, 'महाराज, कंदील उन बाबूसाहबको दे देवो.' महाराजानें प्रश्न केला, 'कौन बाबू साहबको?'

" माझ्याकडे बोट दाखवून ती त्याला म्हणाली, 'वह देखो, वे वहां चूल सिलगा रहे हैं न उन्हीको ! बहुत तकलीफ हो रही है बिचारोंको.'

" असंतुष्ट दृष्टीनें एकवार माझ्याकडे पाहून महाराज म्हणाले, 'हां, तकलीफ तो करना ही पडती है । तीरथ करने जा रहे है ना. बिना तकलीफ के तो तीरथ बीरथ होता नहीं. मगर हम कंदील उन्हे कैसे ?....फिर यहां ? इतने अंधेरे मे...'

" महाराजाचे हे उद्‌गार ऐकून चारुबाला रागानें लाल होऊन त्याच्या अंगावर खेंकसली. ह्या वेळेला तिनें महाराजांच्या हिंदीचा आश्रय न घेतां आपल्या मातृभाषेचा आधार घेतला. मला वाटतं, अगदीं अंतःकरणापासून जें बोलायचं असतं ना माणसाला, त्यासाठीं मातृभाषेपेक्षां दुसरी अधिक सोयीची भाषा नसतेच. म्हणून तर मातृभाषेचं महत्व !"

मी म्हणालों, " विषयांतर होतं आहे हें, सोमेश्वर."

सोमेश्वर म्हणाले, " चारुबाला त्यांच्या अंगावर खेकसून म्हणाली, जळलं मेल्याचं लक्षण. हलकट मेला आणि असें म्हणून ती ताडकन् आपल्या कांबळ्यावरून उठली. बाहेर येऊन ती माझ्याजवळ येऊन उभी राहिली. त्यानंतर, एक क्षणभरच विचार केल्यासारखं करून तिनें माझ्या हातातून स्वयंपाकाचं सामान, भांडं बिडं एक प्रकारें हिसकावूनच घेतलं आणि म्हणाली, 'चला, बाजूला व्हा. तुमच्यासारखी कामाची तऱ्हा मी पाहिली नाहीं जगांत. तुम्ही कसला स्वयंपाक करणार कपाळाचा ? चूल ही अशी पेटवतात ? धड

लाकडं पेटवतां येत नाहींत तुम्हाला ! मग करतां येतं काय ? चला, व्हा दूर.'

"त्यानंतर तिनें दगड पुन्हा नीट मांडले, चूल नीट तयार केली, अन् पाहतां पाहतां लाकडं पेटायला लागलीं. तोंडावाटे बडबड सुरू च होती तिच्या. म्हणत होती ज्याच काम त्यानंच करावं. पुरुष माणसांनीं का कधी स्वयंपाक केला आहे धड ? त्यांनीं आपलं आयतं बसून गिळावं पोटभर, झालं."

मी म्हटलें, "काय म्हणाली, गिळावं ?"

सोमेश्वर म्हणाले,"हो; पण तिच्या ह्या साऱ्या बडबडीच्या मागें राग नव्हता, लोभच होता, ममता होती, हें अगदीं स्पष्टच दिसत होतं."

मी म्हटलं, "बरं, पुढें काय झालं ?"

ते सांगूं लागले, "तिनें चुलीवर आधण ठेवलं अन् त्यांत मूठभर तांदूळ वैरले. नुसता भात शिजविण्यापलीकडे ती दुसरं कांहीं तयार करण्याच्या विचारांत नाहीं असं पाहून मी म्हणालों, 'भाताबरोबर एकादी भाजीबिजी जर.....बटाटे आणले आहेत मी. हे पहा, इथें आहेत......'

"धमकावणीच्या स्वरांत ती म्हणाली, 'पुरे झाली भाजी अन् बिजी ! माणसाच्या लोभीपणाला तरी काहीं मर्यादा असावी म्हणतें मी : आले मोठे भाजी खाणारे. भटाला दिली ओसरी, अन् भट हात-पाय पसरी ! नुसत्या भातानें होणार नाहीं म्हणे; आणखी हवी भाजी !'

"हा भडीमार ऐकला, आणि खरं सांगतों, अपमानामुळें तिथल्या तिथेंच आत्महत्या करून घ्यावी, असं वाटायला लागलं मला ! पण हा विचार माझ्या मनांत एक क्षण, दोन क्षण येतो न येतो तोंच चारुबाला फिदकन् हंसून, अत्यंत आत्मीय भावानें म्हणाली, 'पाहिलंत ना तुमच्यावर त्या माणसाचा किती राग आहे तें ? मेल्यानें कंदील देखील दिला नाहीं तुम्हाला !'





"मी विचारलें, 'पण त्याचा माझ्यावर राग काय म्हणून ? मी कोणतं घोडं मारलं त्याचं ?'

"हें ऐकून तिनें एकदां माझ्याकडे पाहिल्यासारखं केलं आणि म्हणाली, 'खरोखरीच, तुम्ही आपले शुद्ध हेच आहांत झालं !' असें म्हणून तिनें फुंक घालून जाळ पेटविला. जळत्या लाकडांच्या उजेडांत मी पाहिलं, धुरामुळें तिचे डोळे लाल लाल झाले होते आणि त्यांत पाणी तरळत होतं. त्या दिवशीं तिनें लहान लहान कामांत किती मदत केली मला म्हणून सांगूं ? "

मी म्हटलें, " हूं, पुढें चालूं द्या. "

सोमेश्वर म्हणाले, " माझा भात तयार झाला आणि भांडं घेऊन मीहि झोपडींत येऊन बसलों. आम्ही जवळ जवळच जेवायला बसलों होतों. त्या वेळीं महाराजाचं लक्ष नाहीं असें पाहून, त्याची नजर चुकवून, चारुबालेनं त्याच्या स्वयंपाकांतली पुष्कळशी भाजी हळूच माझ्या पानांत वाढून दिली होती, ही गोष्ट आजहि मला चांगली आठवते. किती झालं तरी बायकोची जात. कितीहि निःस्पृहपणानें, तुटकपणानें वागत असली, तरी पुरुषाच्या जेवणाखाण्याच्या बाबतींत बायकांना विशेष आस्था असतेच. त्यांचा स्वभावच आहे हा."

मी म्हणालों, " असं बोलून तुम्ही स्वतःला फसवीत आहांत सोमेश्वर. किंवा असं म्हणा, कीं तुम्ही मला दुसरंच कांहीं तरी भासविण्याच्या उद्देशानें हें असं बोलतां आहांत."

ते म्हणाले, " म्हणजे ? काय म्हणायचं आहे तुम्हाला ?"

मी म्हटलं, " मला म्हणायचं आहे हेंच कीं, चारुबालेचा—तुमचा एक निराळाच-त्या महाराजाला ज्याबद्दल ईर्षा उत्पन्न व्हावी असा-संबंध निर्माण झालेला होता, आणि तुम्हालाहि त्याची जाणीव होती ! ',

" छे, छे, छे, " सोमेश्वर म्हणाले, " असलं भलतंच कांहीं मनांत आणूं नका तुम्ही ! पुढें काय झालं तें ऐका. माझं जेवण-खाण

आटोपलं. नदीवर जाऊन भांडीं-कुंडीं घासलीं–धुतलीं, तीं धर्मशाळेंतल्या रखवालदाराकडें परत नेऊन दिलीं. ह्या साऱ्या गोष्टीला थोडा वेळ लागलाच मला. त्यामुळें, हें सारं आटोपून जेव्हां मी परत झोंपडींत आलों, तेव्हां रात्र बरीच होऊन गेली होती. प्रवासाच्या श्रमांनीं थकलेल्या यात्रेकरूंपैकीं कोणी देखील जागा नव्हता. सारे गाढ झोंपी गेले होते. दाटी-दाटीनें, एकमेकाना घसटून सारे निजले होते. चारुबालेच्या पलीकडेच महाराजांची पथारी लागली होती. त्यानें आपलं टक्कल पडलेलं डोकं आपल्या पथारीवरून घसटत घसटत चारुबालेच्या पथारीवर आणून ठेवलं होतं. तें पाहून मला असं वाटलं,जसा कांहीं बिचारा तिच्यापुढें हात पसरून प्रेमाची, ममतेची भीकच मागतो आहे! चारुबाला अद्यापि जागीच होती. त्याचा तो प्रकार पाहून ती मला म्हणाली, 'ह्या टकल्या थेरड्यानं माझ्याजवळ स्वतःबद्दल किती किती गोष्टी सांगितल्या ! मी तुम्हाला सांगतें, त्यानें आपली सारी वंशावळ अन् घरचा इतिहासच मला ऐकवला. त्याची बायको वारली, अन् तेव्हांपासूनच त्यानं संन्यास घेतला. तीर्थयात्रेच्या अन् प्रवासाच्या निमित्तानं सारं जग पालथं घातलं त्यानं. पण म्हणतो कसा, म्हणे तुमच्यासारखी बाई कधीं कुठें पाहिली नाहीं ! ह्या असल्याच गोष्टींची सारखी वटवट लावून दिली होती त्यानें !'

" तिचं बोलणं कानीं पडून महाराजांनीं डोकें वर उचलून तिला प्रश्न केला, क्या कहा ?

" चारुबालेनें त्याचं डोकं हातांनीं पलीकडे सारलं आणि पुन्हा आपल्या मातृभाषेंतच म्हणाली, 'म्हणालें हेंच, कीं पुरुष माणसाचे केंस पिकले कीं तो चळतो ! समजलांत गर्दभराज शिरोमणि ?'

" महाराज खूष झाल्यासारखे दिसले ! त्यांनीं पुन्हा आपले डोळे मिटून घेतले.

" चारुबाला पुन्हा कांहीं वेळानें त्यालाच उद्देशून बोलूं लागली.

म्हणाली, ' इतकं वय झालं, पण बाया-बापड्यांच्या बद्दल भारी ओढा तुमच्या जिवाला ! खरं ना ? अरे बाबा, तूं संन्यास घे कीं आणखी कांहीं कर. संन्यास कसला घेतला आहेस डोंबल्याचा तूं? मनांत तर असं येतं कीं ह्या रात्रीच्या रात्रींत तुझा गळा दाबून इथेंच तुला परलोकची वाट दाखवून द्यावी बरं का, महाराज !'

" महाराजानें तोंड उचललें, आणि हंसत हंसत त्यानें विचारलें, क्यों ? क्या कहती हो ?

" चारुबालाहि हंसत हंसत म्हणाली, 'पहा, पहा ! पहा तर खरं एकदां. तुम्हाला माझ्या गळ्याची शपथ आहे, एकदां ह्याचा हा विकारानें अन् लोलुपतेनें बरबटलेला चेहरा नीट पाहून घ्या ! मेला माकड कोणीकडचा ! किती दैन्य, किती याचना माखलेली आहे ह्याच्या ह्या थोबाडावर, पाहिलीत ना ? अन् हींच माणसं येताहेत तीर्थयात्रा करायला ! हाच धर्म ! महाराज, तुम्हाला कोणती शिक्षा करायला पाहिजे, ठाऊक आहे ? '

" भाबड्यासारखी अति आनंदानें आपली मान वर करून महाराज तिच्याकडे पहायला लागला. मी तुम्हाला खरं सांगतों, त्या वेळची चारुबालेची दृष्टि पाहण्याजोगी होती ! डोळ्यांत जशी कांहीं आग पेटली होती तिच्या. तरी देखील ती हंसत-हंसतच म्हणाली, ' तिरस्कारानें तुझ्याजवळून उठून मी दुसरीकडे निघून जाईन, असं समजूं नकोस तूं. मी तशापैकीं बाई नाहीं. पण, माझ्या मनांत काय येतं आहे, तें सांगूं ? मनाला वाटतं, तापलेल्या सांडसांनीं तुझे हे दोन्ही डोळे उखडून काढावे ! महाराज, सांगून ठेवतें मी. सापाच्या बिळांत हात घालण्याचं धाडस करूं नका बरं ! तशीच वेळ आली, तर तुझ्या छातीवर बसून ह्या माझ्या नखांनीं मी तुझ्या अंगावरची चामडी सोलून काढीन, सांगून ठेवतें ! माझ्याबद्दल नीट समजून ठेव मनांत, कळलं ना ?'

" झोपडींतल्या त्या वेळच्या त्या अंधुक उजेडांत चारुबालेची त्या

वेळची ती मूर्ति पाहून माझं शरीरहि थरारून गेलं ! तिला शांत करण्याच्या हेतूनें मी सुचविलं, मूर्ख माणूस आहे तो. मऊ दिसलं कीं डोक्यावर चढून बसणाऱ्यापैकीं आहे झालं. त्यापेक्षां तुम्हीच तेथून उठून आपली पथारी दुसरीकडे घाला ना ?

"माझी सूचना ऐकून ती अगदीं दृढ स्वरांत म्हणाली, 'तुम्ही थांबा. कांहीं बोलूं नका. मी अशी, ह्या इथेंच झोपणार ! मला काय करणार आहे हा ? मला कशाचीहि भीति नाहीं. मनात थैमान घालणाऱ्या दुष्प्रवृत्तीच्या जंजाळांत तडफडत हा मेला राहील पडलेला. त्याला कुठली झोंप येणार ? अन् मी आपली पडेन स्वस्थपणें घोरत !' असें म्हणून चारुबाला तेथेंच निजली !

" बाहेर अंधार दाटला होता. थंडीच्या कडाक्यांत रात्र सूं, सूं करीत होती. नदीच्या पलीकडे दाट अरण्य होतं. त्या अरण्यांत वाहणाऱ्या सोसाटयाच्या वाऱ्याचा शब्द कानांवर आदळत होता. वाऱ्याच्या त्या सळसळींत नदीच्या प्रवाहाचा झुळ झुळ आवाजहि मिसळलेला होता. यात्रेकरूंचा कोलाहल अगदीं शांत झाला होता. अशांतच कितीतरी वेळ मी स्वस्थ पडून होतों. त्यानंतर एकाएकीं चारुबालेचे शब्द माझ्या कानीं आले. ती मला म्हणाली, 'जमिनीवर गादीबिदी न घेतां झोपायची तुम्हाला संवय नाहीं. तुम्हाला त्रास होतो आहे, मला वाटतं. माझं अंथरूण देऊं का तुम्हाला ?'

" पुन्हा तेंच ! आला पुन्हा माझ्यापुढें प्रश्न ! मी हो, नाहीं कांहींच बोलूं शकलों नाहीं. स्तब्धपणें पडून राहिलों.

" त्यासरशीं चारुबाला कांहींशी गरम होऊन म्हणाली, 'हें काय ? झोंप लागली कीं काय ? माणूस बोलतं आहे, त्याचं कांहींच नाहीं जसं कांहीं. वा हो वा! अशी झोंप तर मी पाहिली नाहीं कुठें.' "

सोमेश्वरांची गोष्ट इथपर्यंत आली, आणि मग मला वाटायला लागलं, आतां गाडं भलत्या वाटेनें जाणार ! म्हणून, कांहींसा उद्विग्न होऊन मी म्हणालों, " ह्यानंतर काय होणार, त्याची कल्पना आली

मला ! बरं तर, सोमेश्वर, आज इतकंच पुरें. आतां जातों मी घरीं."

सोमेश्वर म्हणाले, " शेवटपर्यंत ऐकून मगच जा ना ? "

मी म्हटलं, " ह्याचा शेवट तर लक्षांत आलाच. ऐकण्यांतच काय आहे मोठंसं ? तुमच्या तरुणपणची गोष्ट, कुठें जाऊन संपायची तें तर स्पष्टच आहे ! "

सोमेश्वर आग्रहाच्या स्वरांत म्हणाले, " तरी पण ऐकूनच जा झालं शेवटपर्यंत ! " असें म्हणून त्यांनीं पेल्यांतली उरली-सुरली व्हिस्की पोटांत घातली आणि डोळे मिटून घेतले. त्यानंतर कांहीं वेळानें त्यांनीं पुन्हा सांगायला सुरुवात केली.





सोमेश्वर सांगत होते, " तिच्याकडून कांहीं घेण्याची छाती होत नव्हती माझी. पूर्वीचा अनुभव होता ना. त्यामुळें मी तिला म्हणालों, 'नको, मला अंथरुण नको तुमचं. माझ्याजवळ आहे तेंच पुरें मला.'

" चारुबाला म्हणाली, ' माझं हें अंथरूण पाहिलं ना ? एक कांबळं, अन् एक लहानशी चादर. बस्.'

" मी म्हटलें, ' कां ? दुसरं कांहीं कां घेत नाहीं आणखी ?'

' ती म्हणाली, ' अंहं. ह्या दोन वस्तूखेरीज तिसरी वस्तु नसते माझ्या अंथरुणांत. थंडी असो, उन्हाळा असो, हेंच माझं अंथरूण. हें कांबळं अन् ही चादर, बस्. आज नऊ वर्षं झालीं, ह्या दोन वस्तू माझ्याबरोबर आहेत.' दोन हातांचा आधार घेऊन, अंथरुणावरच उपडी पडून तिनें आपलं डोकं वर उचललं होतं माझ्याशीं बोलण्यासाठीं. दिव्याच्या मंद उजेडांत मीं पाहिलं, तिच्या कपाळावरचं कुंकु कसं झळकत होतं जसं कांहीं.

"तोंडावरचे केंस मागें सारीत ती म्हणाली, 'मी विचारलं खरं तुम्हाला, माझं अंथरूण देऊं का म्हणून. पण खरं सांगू ? तुम्ही हो म्हणाला असतां, तरी मी कांहीं तें तुम्हाला दिलं नसतं ! ह्या अंथरुणावर मी दुसऱ्या कोणालाहि निजूं देत नाहीं. कोणी योग्यच नाहीं त्याच्या !'

"मला वाटलं, ही बरी संधि आहे. विचारावं तिला आणि मी म्हटलं 'तुमचा नवरा कुठें आहे ?'

"चारुबाला काहीं वेळपावेतों माझ्या तोंडाकडे पाहतच राहिली. त्यानंतर एक निश्वास सोडून म्हणाली, 'ते नाहींत !' त्या पलीकडे ती कांहींच बोलली नाहीं.

"मी पुन्हा विचारलं, 'नाहीं म्हणजे ?'

"ह्यावर ती म्हणाली, 'कळावं अशी इच्छा आहे तुमची, तेव्हां सांगतेंच आता सारं.' बोलतां बोलतां ह्या मिनिटा अर्ध्या मिनिटांत तिचा कंठस्वर कसा अजिबात बदलून गेल्यासारखा मला वाटला. ती सांगू लागली, 'मोठी लांबलचक कहाणी आहे ती. मी असेन त्या वेळीं अठरा वर्षाची. माहेरीं गेलें होतें; तिथून सासरीं आलें. घरांत पाय ठेवतांच मी ऐकलं, माझा नवरा आदल्या दिवशींच वारला म्हणून. पण हें कसं शक्य आहे ? असें कधीं झालें तरी आहे ? मी माहेरीं गेलें, तेव्हां चांगली धडधाकट दणकट प्रकृति होती त्यांची. चांगला पर्वतासारखा धिप्पाड माणूस. असं एकाएकीं मरायला झालं काय त्याला ? मरण इतकं सोपं आहे ? मीं खरं सांगतें तुम्हाला, त्या दिवशींच मला वेड लागलं. माझा नवरा मेला नव्हता. मरेल कसा ? चोवीस वर्षाचा चांगला धट्टा कट्टा जवान तो. तो मरणं शक्य नाहीं.' बोलतां बोलतां उत्तेजित होऊन चारुबाला अंथरुणावर उठून बसली. म्हणाली, 'जर त्याला मरायचंच होतं, तर माझ्या मांडीवर डोकं ठेवून कां नाहीं मेला तो? कां माझ्याशीं अशी फसवणूक केली ? झालं, त्याच दिवशीं मी तशीच निघालें, त्याच्या

त्याच मृत्यूच्या मागें. मनाशीं पक्कं ठरवलं, म्हटलं, यमाच्या हातून त्याला परत आणायचंच. लग्न झालं होतं आमचं, तें चांगलं देवा-ब्राह्मणांच्या साक्षीनें. मंत्र म्हटले गेले होते चांगले. तें सारं इतकं खोटं,थोतांडच होतं ? कसं शक्य आहे ? नाहीं, तो मेला नाहीं. मरणं शक्य नाहीं तो. कधीं ना कधीं मी त्याला परत आणीनच ! एक ना एक दिवस मी त्याला पकडीनच. कधीं सोडणार नाहीं.' "

सोमेश्वर सांगत होते. मी मुग्ध होऊन ऐकत होतों नुसता.

थोडा वेळ थांबल्यानंतर ते पुढें सांगू लागले. म्हणाले, " किती विलक्षण रहस्यानें भरलेली ती अंधारी रात्र होती त्या दिवशीची ! सती-साध्वी स्त्रियांच्या गोष्टी तुम्ही ऐकल्या असतील पुष्कळशा ! पण तिच्या आत्मविश्वासाचं, तिच्या आत्मप्रत्ययाचं रूप कसं असतं, तें कधीं पाहिल आहे का तुम्ही डोळ्यांनीं ? आंतलं तेज बाहेर फुटून येऊन कसं ज्योतिर्मंडल होऊन उठतं, त्याकडे कधीं लक्ष गेलं आहे तुमचं ? मी त्या रूपाचं दर्शन त्या रात्रीं घेतलं ! "

काय बोलणार मी ? बोलण्यासारखं होतंच काय माझ्याजवळ ? मी स्तब्ध बसून राहिलों.

कांहीं वेळानंतर सोमेश्वरच पुढें सांगू लागले, " ' आज ना उद्यां, कधीं ना कधीं, मी त्यांना शोधून काढीनच काढीन !' असं बोलतां बोलतां चारुबालेचा सारा देह आवेगानें थरथर कांपत होता. तिच्या डोळ्यांत निराळीच स्वप्नरेखा तरळूं लागली! तिच्या कंठस्वरांत संगीताची गान-माधुरी विहार करूं लागली ! तिचं रूप अपरूप सौन्दर्यानें झळाळूं लागलं! त्या दिवशीं मी तिला वेडी ठरवलं नाहीं. तिच्या अंतर्मनाचं विश्लेषण करण्याच्याहि भानगडींत मी पडलों नाहीं. तिचा, तिच्या व्यक्तित्वाचा अत्यंत जवळून, दाटपणें मी अनुभव घेत होतों ! ती पुढें सांगू लागली. म्हणाली, ' नऊ वर्षं झालीं त्या गोष्टीला; त्यांच्या शोधांत नऊ वर्षं झालीं, मी सारखी पायपीट करीत हिंडतें आहें ! हें अंथरुण त्याचंच, हा माझा देह त्याचाच, माझं जें कांहीं

आहे तें सारं त्यांचंच तर आहे! ..मला टाकून तो जाऊं कुठें शकतो, सांगा तर खरं? किती दुःखांत माझे दिवस जात आहेत, किती विपत्तींत! ..पण तो भारी निर्दय आहे! अजूनहि त्याची माझी भेट होत नाहीं!' बोलतां बोलतां तिच्या डोळ्यांतून अश्रू झरझरा वहायला लागले.

" मी गप्प बसून होतों. मनाशीं म्हटलें, भावनेच्या प्रचंड प्रवाहांत वाहत चाललेली ही! कधीं किनारा सांपडेल का हिला?

" डोळे पुसून चारुबाला पुढें म्हणाली, 'साऱ्या आयुष्यभर जिवांत जीव आहे तोंपर्यंत मी आपला प्रयत्न सोडायची नाहीं. जिथें जिथें माणसांची गर्दी असेल, तिथें तिथें जाईन, अन् त्याला हुडकून काढण्याची खटपट करीन! सापडणार नाहीं तो मला? कधीच हातीं लागणार नाहीं माझ्या तो, सांगा पाहूं तुम्हीच!' "

एवढें बोलून सोमेश्वर स्तब्ध होऊन बसून राहिले.

कांहीं वेळ वाट पाहिल्यानंतर मीच म्हटलें, " त्यानंतर काय झालं?"

ते म्हणाले, " त्यानंतर सकाळ झाली. मी आणि महाराज, दोघेहि झोंपेंतून जागे होऊन पाहतों, तों काय? झोपडींत आम्हा दोघांशिवाय तिसरं माणूस नाहीं! इतर सर्व यात्रेकरूंच्या बरोबर चारुबाला देखील मोठ्या पहांटेसच आम्हांला मागें टाकून चालती झाली होती!"

मी म्हटलें, " म्हणजे? त्यानंतर तुमची-तिची भेटच कधीं झाली नाहीं?"

सोमेश्वर प्रशांत स्वरांत म्हणाले, " नाहीं!"

मी उठून उभा झालों. काठी हातांत उचलीत म्हणालों, " वेडी, वेडी! पागल होती तुमची ती चारुबाला! विणकराचं रक्त होतं तिच्या अंगांत! त्यामुळेंच इंद्रजाल विणीत होती, झालं!"

भारी ओझ्याखालीं दडपलेल्या मनानेंच त्या दिवशीं मी सोमेश्वरांच्या वाड्यांतून घरीं परत आलों !





नेमका कोणत्या दिवशीं मृत्यु आमची सोडवणूक करणार, ह्याचं मोज-माप आम्ही कधीं घेतलं नाहीं. मी आणि सोमेश्वर, आम्ही दोघे एका गतकाळच्या युगाचा इतिहास पुढें धरून बसलों आहोंत आपले ! एक एक दिवस म्हणजे आमच्या पुढें एक मोठं प्रश्नचिन्हच ! आपलं जीवन म्हणजे हें आमचं म्हातारपण, आमचं आम्हांलाच बरं वाटत नाहीं. त्या दिवशीं सोमेश्वर म्हणाले होते, 'शरीर म्हातारं झालं खरं. पण मनाच्या आंत म्हातारपण कां येत नाहीं अजून ? महाकालाच्या खतावणींत खर्चाच्या खात्यांत का भलत्याच वेळीं माझं नांव पुन्हा पुन्हा दाखल होतं असं ?'

कां असं होतं, त्याचं कारण मला ठाऊक आहे. ह्या संसारांतली आमची गरज आतां संपली आहे ! महाकालाच्या दृष्टीनें, जीवनापेक्षांहि यौवनाची किंमत अधिक ! माणसांची सृजनशक्ति जोंपर्यंत कायम असते, तोंपर्यंतच त्याला उपभोग घ्यायचा अधिकार असतो. तें संपलं कीं मग सारं संपलं. मग तुम्ही जिवंत असला तरी नसल्यासारखेच !

हुक्क्याच्या चिलमींतली गुडाखू जळून गेला होता. आम्ही दोघे एकमेकांच्या समोर बसलों होतों. पुष्कळ दिवसानंतर आज कुठें थोडीशी अध्यात्माची तत्त्वज्ञानाची चर्चा करण्याचा मी प्रयत्न

केला. ह्या दोन्ही विषयांचं माझं ज्ञान आपलं यथातथाच आहे, म्हणूनच हृयाच विषयांना घेऊन मी अधून मधून उगाच आपलं तोंड चालवीत असतों झालं !

सोमेश्वरांचा वाडा आहे त्या मोहोल्ल्यांत, चांगल्या श्रीमंत, सुशिक्षित गृहस्थांचींच घरं आहेत. सारी सुधारलेली मंडळी राहतात तिथें. ह्या असल्या सुधारलेल्या सभ्य लोकांच्या बद्दल माझ्या मनांत एका विशेष प्रकारच्या आदराची भावना वसत असते. हृया श्रद्धेचं कारण हेंच कीं ते आपल्या सुधारलेल्या मार्गावरून जाणं-येणं चालूं ठेवीत असतांना उगाच आरडा-ओरडा करीत सुटत नाहींत कधीं. त्यांचं जें कांहीं असेल तें सारं अगदीं गुपचप, अंधारांतच पार पडेत असतं. आरडा-ओरडा अन् आदळ आपट हीं सारीं गांवढळपणाचीं लक्षण. तीं सभ्य सुसंस्कृत समाजांत कुठलीं आढळणार ? पण नित्याचा हा जीवनक्रम आज कांहींसा बदललेला मी पाहिला, आणि मी सोमेश्वराकडे दृष्टि वळवून विचारलं, " आज हृया शेजारच्या घरांत कांहीं विशेष गडबड दिसते आहे ? भांडणं चालूं असल्यासारखीं दिसतात ! "

सोमेश्वर म्हणाले, " त्याचीं सुद्धां एक कथाच आहे ! "

मी म्हटलं, " बाकी गोष्टी राहूं द्या. लोकांच्या भानगडीशीं आपल्याला काय करायचं आहे ? भांडणाचं कारण काय, तेवढं सांगा झालं. "

सोमेश्वर हंसायला लागले. मग माझी मलाच ते विचारल्याबद्दल लाज वाटायला लागली. डोक्याचे केस पिकल्यानंतर संयम आला थोडा बहुत, हें खरं. पण मधून मधून दुसऱ्यांच्या भानगडींत लक्ष घालण्याकडे, दुसऱ्यांच्या बद्दल असती-नसती चर्चा करीत बसण्याकडे तरीहि मन धांवतंच ! कां असं होतं तें कळत नाहीं. पण होतं खरं असं ! आयुष्याच्या शेवटीं शेवटीं माणसाच्या कुप्रवृत्तींना भरपूर अवसर सांपडतो आणि त्यामुळेंच त्या अशा डोकं वर काढतात कीं काय,

कोण जाणे! म्हणूनच मला वाटतं म्हातारे आणि म्हाताऱ्या तीर्थयात्रा करायला जात असावेत; धर्मासाठीं नाहीं, पुण्यसंचय व्हावा म्हणून नाहीं, परमेश्वरप्राप्तीसाठींहि नाहीं! म्हातारीं माणसं तीर्थयात्रा करायला जातात, मला वाटतं, आत्मशुद्धीचा डाव मनांत धरून!

सोमेश्वरांनीं शेजाऱ्याच्या भांडणाबद्दल माहिती सांगितली. ते म्हणाले, "नवरा–बायकोचं भांडणं झालं आहे."

"जाऊं द्या, सोमेश्वर! नको ऐकायला दुसऱ्यांच्या भानगडी." असें मी तोंडानें फक्त बोललों, आणि पुढें ते काय सांगतात तें ऐकण्यासाठीं आत्यंतिक उत्सुकतेनें मी त्यांच्या तोंडाकडे पाहूं लागलों. त्याच वेळीं, शेजारच्या त्या घरांत गोंधळ चांगलाच रंगांत आल्यासारखं वाटलं. कांहीं वेळपर्यंत अत्यंत लक्षपूर्वक तें भांडण ऐकण्याचा प्रयत्न करून मी म्हणालों, "ह्या असल्या गोष्टी तर माझ्यासारख्याच्या घरांतच होतात!"

"तुम्ही लोक ठरलांत असंस्कृत, असभ्य, गांवढळ! म्हणूनच साध्यासुध्या, लहान-सहान गोष्टींवरूनहि मारे रणं माजवून तुम्ही आपल्या घरांतल्या गोष्टी आरडा-ओरडा करून वेशीवर टांगतां. पण जे सभ्य, सुसंस्कृत, असतात ना! त्यांचं तसं नाहीं. ते असल्या गोष्टी गुपचुप उरकून टाकीत असतात!"

"तर मग, हें–?" असं म्हणून मी शेजारच्या घराकडे पाहूं लागलों.

सोमेश्वर म्हणाले, "मला वाटतं, आज कांहीं तरी विशेष घडलं असलं पाहिजे! त्या दिवशीं मी तुम्हाला सांगणार होतों; पण तें तसंच राहून गेलं. त्या घरांत एक डॉक्टर आणि त्याची बायको, असे दोघेजण राहतात. डॉक्टर वयानें तरुणच आहे. तशीच त्याची बायकोहि. तिचं नांव आहे प्रभा. ती स्वतः मोटार चालवते. नवराबायकोच्या दिवाणखान्यांत त्यांच्या मित्रमैत्रिणींचा अड्डाहि चांगलाच

जमतो. पुष्कळसे त्यांच्याच वयाचे तरुण आणि तरुणी त्यांच्याकडे जमतात फ्लर्टिंग करण्यासाठीं. चार-दोन ब्रीफलेस बॅरिस्टरहि येतात एक-दोन व्हिस्कीचे पेग मिळवण्यासाठीं. ''

"पुरें झालं बुवा, सोमेश्वर! ह्या असल्या गोष्टी ऐकणं बरं वाटत नाहीं बुवा आपल्याला आतां ह्या वयांत " असें म्हणून मी उठून घरीं जाण्याचं सोंग आणलं. पण तें नुसतं सोंगच होतं, ही गोष्ट सोमेश्वरांच्या नजरेंतून सुटूं शकली नाहीं. म्हाताऱ्या माणसांचे परनिंदा ऐकायला उत्सुक कान, आणि त्याबरोबरच, स्वतःची आणि दुसऱ्याचीहि फसवणूक करूं पाहणारी त्याची वृत्ति,ह्या दोन्ही गोष्टी सोमेश्वरांच्या चांगल्याच ओळखीच्या असाव्यात. ते मला थांबवीत म्हणाले, " बसा हो, इतक्यांतच कोणती घाई आहे जायची? मी तुम्हाला सारी गोष्ट नाहीं सांगत त्या मंडळीची. फक्त आजच्या ह्या भांडणाचं मूळ काय तेवढंच सांगतों. "

" बरं तर सांगा. "

" त्या डॉक्टरची बायको अधून मधून अगदीं सकाळींच मोटार घेऊन बाहेर जाते अन् पुष्कळ उशीरा परत येते, ही गोष्ट तिच्या त्या नवऱ्याच्याहि लक्षांत आली असावी. "

" कुठें जाते ती ?"

" जाते अशीच बागेंत !''

" कशाला ?"

सोमेश्वर म्हणाले, " बरोबर प्रश्न विचारलात तुम्ही. त्या तिच्या नवऱ्याच्याहि मनांत ह्राच प्रश्न उभा राहतो आणि तेंच त्यांच्या मनांत चलबिचल उत्पन्न होण्याचं कारण. ''

" जाऊं द्या, सोमेश्वर. अधिक कांहीं ऐकण्याची इच्छा नाहीं आतां! स्त्रियांची जात मुळांतच पुरुषापेक्षां फार अधिक धाडसी अन् साहसी असते." असें म्हणून मीं काठी उचलली, आणि बाहेर पडण्यासाठीं दाराकडे वळलों; पण बाहेर कांहीं जाऊं शकलों नाहीं.

त्याच वेळीं एक तरुण गृहस्थ त्याच दारांतून दिवाणखान्यांत येत होता. सोमेश्वरांच्या समोर येऊन तो दाटलेल्या स्वरांत म्हणाला, "काकासाहेब, एकदा माझ्या घरापर्यंत यायलाच हवं तुम्हाला. ह्या साऱ्या भानगडीची एकदांची कांहीं तरी व्यवस्था लावून द्या. तुमच्या-वांचून दुसरं कोणी करूं शकणार नाहीं हें! पुष्कळच बदनामी झाली आहे माझी ! पुष्कळच इन्सल्ट झाला ! आतां हें सारं. . . .'

सोमेश्वर आराम खुर्चीवर पडले होतें तें सरळ उठून बसले आणि म्हणाले, " झालं तें गेलं, डॉक्टर! मला तुम्ही एक सांगा. तिला तुम्ही क्षमा करूं शकणार नाहीं का ? "

डॉक्टर म्हणाले, " काकासाहेब, क्षमा करायची म्हणतां ? पण क्षमा करणं सोपं का आहे ? माझी बायको असून तिनं माझ्याशीं केवढा भयंकर विश्वासघात केला आहे, ह्याची जर तुम्हाला कल्पना असती तर. . . ." बोलतां बोलतां त्यांचा गळा दाटून आला. डॉक्टर म्हणाले, " तिला क्षमा करणं सोपं नाहीं, काकासाहेब ! तिच्यासाठीं मी काय काय नाहीं केलं ? '

सोमेश्वर म्हणाले, " खरं आहे, डॉक्टर. कबूल आहे मला तुमचं म्हणणं. पण माणसाचं मन एक मोठी विचित्र गोष्ट आहे. तें बांधून ठेवणं कोणालाहि शक्य झालं नाहीं आजपर्यंत. मनाच्या गतीचा पंथच अगदीं निराळा असतो, त्याला कोणाचा काय उपाय ? "

गरीब बिचारा डॉक्टर ! त्याच्या डोळ्यावाटे, मला वाटतं, आसवं गळत असावींत. सोमेश्वरांचं उत्तर ऐकून तो बोलणार तरी काय त्यावर ?

कांहीं वेळानंतर सोमेश्वर पुन: त्याची समजूत घालीत म्हणाले, "त्या रमेश नांवाच्या छोकऱ्यावरूनच हें वादळ निर्माण झालं असावं बहुधा, खरं ना ? मला वाटतच होतं असा कांहींतरी प्रकार होईल असं. ज्या पद्धतीनं आजकाल साऱ्या गोष्टी घडताहेत, त्यांत असले कांहीं प्रकार न झाले तरच नवल. ह्यांत अस्वाभाविक किंवा आश्चर्य वाटण्या-

जोगं असं कांहींच मला दिसत नाहीं. आपल्या मनाला येईल तसं वागण्याची स्वतंत्रता बायकांना आहे असं जर आम्ही अमान्य करायला लागलों, तर मग स्त्रियांना शिक्षण देण्याचं महत्त्वहि आम्ही अमान्यच केल्यासारखं होणार आहे ! त्यांना शिक्षण द्यायचं, म्हणजे मग त्यांचं ह्या बाबतींतलं स्वातंत्र्यहि कबूल केलंच पाहिजे असं माझं आपलं स्पष्ट मत आहे." असं म्हणून सोमेश्वर माझ्याकडे वळून म्हणाले, "काय ? मी म्हणतों तें बरोबर आहे कीं नाहीं ? तुम्हांला काय वाटतं ह्यासंबंधांत ?"

माझ्यापर्यंत प्रश्न असा सरळ सरळ येऊनच पोहोंचला, तेव्हां मलाहि पुढें येणं भागच पडलं. मी म्हणालों, "म्हणणं बरोबर आहे तुमचं, सोमेश्वर. पण, दुसऱ्याला उपदेश करणं जरी सोपं असलं, तरी माणसाच्या सहनशक्तीलाहि कांहीं मर्यादा आहेच ना ? त्यापेक्षां, मला तर वाटतं, त्यांनीं चांगल्या, शुद्ध, पवित्र वातावरणांत राहाणं हें अधिक आवश्यक आहे ! ह्या दोघांनीं 'नीति–संवर्धक–मंडळा'चे सभासद होऊन जावं आजपासूनच !"

सोमेश्वर म्हणाले, "तुम्हाला काय वाटतं ? तुमचं हें 'नीति–संवर्धक–मंडळ' माणसाच्या जन्मजात प्रवृत्तींत अन् स्वभावांत परिवर्तन घडवून आणील ?"

मी म्हटलं, "परिवर्तन घडवून न आणो वाटल्यास. पण त्यापासून एक फायदा मात्र अगदीं निश्चितपणें होईलच. हे दोघेहि नवरा–बायको 'नीति–संवर्धक–मंडळा'चे सभासद झाले म्हणजे, कमींत कमी आजच्या ह्यांच्या कौटुंबिक जीवनावर जो हा कलंकाचा डाग लागला आहे, त्यावर कोणी विश्वास ठेवायला तयार व्हायचं नाहीं. मला तर वाटतं सोमेश्वर, तुम्ही आणि मी, आपण दोघेसुद्धां त्या मंडळाचे सभासद होऊन जाऊं या !"

सोमेश्वर हंसले, आणि डॉक्टरसाहेबांचं सांत्वन करायला लागले. मी हळूं हळूं काठी टेकीत घरचा रस्ता सुधारला !



# नवीं प्रकाशन

| | कि. रु. |
|---|---|
| छत्रसाल--वालचंद शहा, ३ री आवृत्ति .. | ३ |
| भिरभिरें--गंगाधर गाडगीळ .. .. | ३ |
| तूं भेटायला नको होतास--सरोजिनी बाबर .. .. | ३ |
| मायेचा पाझर--शांता शेळके .. .. .. | ३॥ |
| मीलन--अरविंद गोखले .. ... .. | ३ |
| सम्राट् अशोक--वालचंद शहा, ३ री आवृत्ति .. | ६ |
| सर्व हक्क स्वाधीन--बोकील .. .. .. | ४ |
| भूकबळी--सुरेश शर्मा .. .. .. | २ |
| पूर्व आणि पश्चिम--शांतिलाल भंडारी .. .. | ४॥ |
| वैरपूर्ती--कन्हैयालाल मुनशी, २ री आवृत्ति .. .. | ८ |
| अल्मिनार--पद्माकर डावरे .. .. .. | ३ |
| जीवननृत्य--मीनाक्षी साने .. .. .. | ३॥ |
| गुजराथचा नाथ--कन्हैयालाल मुनशी, २ री आवृत्ति... | ६ |
| बजाजी निंबाळकर--वालचंद शहा .. .. | ४ |
| नौकाडुबी--टागोर, २ री आवृत्ति .. .. | ५ |
| गोषांतील सुंदर स्त्रिया--कोठारी, ३ री आवृत्ति .. | ५ |
| गृहिणी (टॉलस्टॉय)--निरंतर, २ री आवृत्ति .. | ३ |
| जागरण--अरविंद गोखले .. ... .. | ३ |
| पाटलाची लेक--चौगुले .. .. .. .. | ३ |
| ओझरती नजर, २ री आवृत्ति--नाईक कि. मा. .. | ३ |
| मदिरा-मस्तानी--भांगरे, २ री आवृत्ति .. ... | २॥ |
| लंडन येथील गुप्त कृत्यें, भाग १ ते ५ .. प्रत्येकीं | १॥ |
| सैन्य चाललें पुढें-बोकील .. ... .. | ३ |
| कावळा व ढापी--न. चिं. केळकर .. .. | ४ |
| क्रांतीवीर रासबिहारी बसू--बाळशास्त्री हरदास .. | १॥ |

| | |
|---|---|
| तिसऱ्यांदा चिमणराव—चि. वि. जोशी | ३ |
| वणव्यांतलें फूल—समाजसुधारक, २ री आवृत्ति | ५ |
| हिरवा चुडा—कु. डॉ. सरोजिनी बाबर | ३ |
| प्रतापादित्य—हडकर, २ री आवृत्ति | ५ |
| कुमार अशोक—लिमये २ री आवृत्ति | ५ |
| जगाचा बाजार-भाग १ते३; २ री आवृत्ति, प्रत्येकीं | ५ |
| विजयनगरची साम्राज्यस्थापना—दातार, २ री आवृत्ति | ५ |
| अमृत कीं विष—हडकर, २ री आवृत्ति | ५ |
| सोनेरी खंजीर—ग. वि. कुलकर्णी, ३ री आवृत्ति | २॥ |
| धरणीकम्प—वि. वा. हडप, २ री आवृत्ति | ४ |
| प्रेमाश्रम—भाग १ व २ अज्ञात, २ री आवृत्ति प्रत्येकीं | ४ |
| रक्ताचें गालबोट—द. वि. परांजपे, २ री आवृत्ति | ५ |
| प्रेमबंधन—रा. ह. दातार, २ री आवृत्ति | ५ |
| देवी कल्याणी—अज्ञात, २ री आवृत्ति | ४ |
| भाईबंद—रा. ह. दातार, २ री आवृत्ति | २ |
| नराचा नारायण—रा. ह. दातार, २ री आवृत्ति | २ |
| वीरात्मा भाग १।२ आ. २ री—गणेशशास्त्री फाटक प्रत्येकीं | ५ |
| ढोंगी गुरूच्या सैतानी लीला—गणेशशास्त्री फाटक २ री आ. | ४ |
| हा संशयाचा प्रताप—ग. वि. कुलकर्णी, २ री आवृत्ति | ४॥ |
| भीषण सूड—अज्ञात, २ री आवृत्ति | ४ |
| जर्मन युद्धावरील मोहीम—सहृदय, २ री आवृत्ति | २॥ |
| गहन गूढ—अज्ञात, २ री आवृत्ति | २॥ |
| गृहदेवी—प. स. देसाई, २ री आवृत्ति | ५ |
| मुकुट—रवींद्रनाथ टागोर, २ री आवृत्ति | ॥ |
| मृगेंद्र-लीला—अज्ञात, २ री आवृत्ति | ४ |
| वडीलधारी माणसें—कु. डॉ. सरोजिनी बाबर | २ |
| अजिता— „ „ „ | ३ |